लेखक
बॅ. सावरकर

# सावरकर साहित्य

## भाग ४ था

किंमत १२ आणे

# प्रस्तावना

धर्मभोळेपणा आणि पोथीनिष्ठा यांची पकड पंडित म्हणवून घेणाऱ्या पुरुषांच्या मनावरहि जबरदस्त बसलेली दिसते; मग ज्यांना शिक्षणाचा लाभ फारसा होऊं शकत नाहीं आणि ज्यांना बाहेरच्या जगाची ओळखहि क्वचितच होते, अशा आपल्या गृहबद्ध महिलांच्या मनांत धर्मभोळेपणा आणि परंपरागत आचारावरील श्रद्धा हीं दृढमूल झालीं असल्यास नवल कसलें? त्यांनीं अंगिकारलेलीं व्रतें आणि धार्मिक छापांचे कित्येक आचार 'इहपरलोकीं सुख देणारे' म्हणूनच अंगिकारलेले असतात. पोथींतच तसें सांगितलेलें असतें आणि पोथीं-तलीं वचनें विवेकाच्या कसोटीवर पारखून घेण्याची कल्पनाहि त्यांच्या मनाला शिवत नाहीं.

पण हे रूढ धर्माचार विचारी दृष्टीला नुसते वेडेपणाचेच दिसत नाहींत, तर ते उपद्रवकारक असल्याचेंहि दिसून येतें. परलोकीं सुख-प्राप्तीची आशा त्यांच्यापासून किती असेल, तें कोणालाच माहीत नाहीं. पण इहलोकीं क्लेश देण्याचें कार्य मात्र हे आचार हमखास करतात. अपराध नसतांना आणि स्वतःच्या हातानें स्वतःलाच दंडणारे हे व्रतविधि पाहून विचारी मनाला विस्मय व खेद वाटल्या-वांचून राहाणार नाहीं.

व्यक्तीच्या स्वास्थ्याबरोबरच समाजाचें हितहि साधणारीं व्रतें आतां कोणतीं व कशीं स्वीकारावीं याबद्दल दे. भ. सावरकरमहा-शयांचे विचार आमच्या वाचक बंधु-भगिनींना मार्गदर्शक तर होती-लच, पण मनोरंजकहि वाटतील असा विश्वास वाटतो आणि सावरकर-साहित्याच्या पूर्वींच्या भागांप्रमाणेंच या भागाचें स्वागतहि वाचक आस्थेनें करतील, अशी मी आशा करतों.

शं. वा. किर्लोस्कर

# अनुक्रमणिका

# अनुकाकू

"काकू ! आलास का अेकदांचा शाळेंतून ? शाळेंतलीं मुलं मघांच घरोघर जाअून जुनींपुराणीं देखील झालीं नी तूं आतां घरास पोंचलास काय रे ? दहाला शाळा सुटायची नी तुला दहा पावलांवर घरीं यायला अकरा वाजायचे ! थांब मेल्या, हें अुचटणं तर बघ कसं लाल करून ठेवलं आहे · डाग देतें थांब, ये असा ! हं हं हं, चुलीपाशीं · अरे चल ! हट् मागं, घटिंगण मेला ! पाय धुतल्यावांचून माझ्या सैंपाकघरांत पाअूल टाकतां कामा नये ! जोडा घालूनच आंत आला नाहींस हेच अुपकार !"

"कोणाचं अडलं होतं पाअूल टाकायला !" काळू हीः हीः हीः हंसत आअीला म्हणाला, 'तूंच म्हणालीस ये आंत डाग देतें, म्हणून आलों ! पण काकू, आज तापलेलं अुचटणं नाहीं अं— आज

पहिल्यानं चाकोलेटची पेटी काढ कुठं आहे ती ! गेल्या महिन्या-पर्यंत माझा मराठी चवथींत चवतिसावा क्रमांक असे, म्हणून हिणवीत होतीस नं ?"

"मग आज कोणचा असा पराक्रम करून आला आहेस काळू ? गेल्या महिन्यांत तुझा क्रमांक चवतिसाचा तेतीस तरी झाला का ? अेक क्रमांक जरी वर गेला असला नं, तरी चाकोलेट देअीन बरं काळू !"

"तर मग अैक ! आज आमचे नवे क्रमांक लागले, त्यांत माझा अठरावा क्रमांक आला !"

"काय म्हणतोस ? काळू, खोटं ठरलं तर थोबाड फोडीन अं !"

"शपथ ! काकू ! माझा खरोखरच अठरावा क्रमांक आला आज वर्गांत !"

"भले वीर ! आमच्या काळूची बुद्धि वाअीट नाहींच मुळीं ! पण अुनाड नी आचरट ! या महिन्यांत अभ्यास केलास तर बघ अेकदम सोळा क्रमांक वर चढलास नं ! ही घे, चाकोलेटची भरलेली पेटीच घे हो बाळ ! बघ, पेटी दिली नं ? जर तूं पुढच्या महिन्यांत आणखी सोळा क्रमांक वर गेलास नं, तर अशा दोन पेट्या देअीन मी तुला ! अभ्यास केलास कीं क्रमांक वर गेलाच पाहिजे बरं तुझ्या-सारख्या बुद्धिवान् मुलाचा !"

"अग काकू, अभ्यास कशाला हवा ?" चाकोलेटांची पेटी घेअून सैंपाकघरांतून मधल्या घरांत सुरक्षित अंतरावर गेलेल्या नी चाकोलेटांचा बोकणा तोंडांत कोंबलेल्या काळूनें अडखळत बोलण्यास आरंभ केला, "अभ्यासच ग कशाला हवा ? माझ्या वर्गांत चौति-साव्या क्रमांकावरून मी जो आज अेकदम सोळा क्रमांक वर चढून आलों, तो अभ्यास न करतांसुद्धां वर आलों– हीच तर खुबी ! बघतेस काय अशी काकू ? शपथ ! अभ्यास मीं मुळींच केला नाहीं.

अग, तें असं झालं– सांगतों अं–" चाकोलेटांचा आणखी अेक बोकणा भरून काळू अेक पाय मधून मधून वेळीत नी शांतपणें हंसत हंसत सांगूं लागला, "अग, माझ्या वर्गांत चौतीस मुलं नव्हतीं का ? तेव्हां मी चौतिसावा नव्हतों का ? आतां आज काय झालं, कीं आमच्या शाळेच्या अुलट पक्षाची ती दांडेकर शाळा आहे न ? त्यांनीं पुष्कळ पालकांना आमच्या शाळेविरुद्ध मथविलं. आणि त्यामुळं आज आमच्या वर्गांतील पंधरा सोळा खालचीं मुलं आमची शाळा सोडून या महिन्यापासून दांडेकरांच्या शाळेंत निघून गेलीं. अुरलीं अठरा. तेव्हां मास्तर म्हणाले– मिळून रांगेनं बसा नी नवे क्रमांक मोजा ! तेव्हां मी नुसता सरकलों नी अठरावा आलों ! असाच आणखी अेखादा लग्गा लागला तर पहिलाहि येअीन हो काकू ! अभ्यासच ग कशाला हवा त्याला ?"

अितक्यांत ताडदिशीं अेक लाटणें काळू होता तिथें येऊन आदळलें. पण अनुभवानें तें तिथें काकूकडून फेकलें जाणार हें आगाअूच ओळखून झटकन् मागें पळून जाण्यासाठीं सज्ज असलेल्या काळूनें अेक मागें अुडी घेतली, पुन्हा झेंप घालून तें लाटणें अुचललें नी हटत हटत जोडे-वहाणा ओटीवर ठेवीत तिथपर्यंत तो खिदळत आला ! त्याचा पाठलाग करीत काकूबाअीहि पुढेंपुढें घुसल्या. पण काळू जोडे-वहाणा होत्या तिथें जातो हें पहातांच त्यांचें सारें अवसान खचून रागावण्याच्या ठायीं त्या काकुळती येऊन म्हणूं लागल्या, "अरे, जोडे ! शिवशील मेल्या माझं तें सोळयांतलं लाटणं घेऊन ! दे रे बाबा तें अिकडे अेकदांचं ! नाहीं, नाहीं, नाहीं मारणार पुन्हा फेंकून ! अरे शिवशील ! त्या वहाणा ! अरे–! "

"मग नाहीं ना मारणार ? नाहीं ना ?"

त्याचें हें करारपत्र नक्की होतें आहे तोंच अेक टपाली आवाज दाराकडून त्यांच्या कानांवर आला– 'विष्णुपंत देवधर !' मागोमाग अेक पाकीट भिरदिशीं दारांत पडलें.

" बाबांचं आलं आहे पत्र ! फोडूं काय ग काकू मीच ?" आभीला तोंडानें असें पुरतें विचारून संपलें नाहीं तोंच काळूच्या हातांनीं तें पत्र फोडलेंहि होतें !

" फोडलंस अेकदांचं पाकीट ! पण वाचतां येतंय् का अेक अक्षर तरी ?"

" काय समजली आहेस तूं काकू ? आतां मराठी चवथींतला अठरावा क्रमांक आहे माझा ! वा, अक्षर पण स्वच्छ बाळबोध ! हात्येच्या ! हं, अैक, वाचतों."

कांहीं अडखळत पण अेकंदरींत स्पष्ट अर्थ कळेल असें काळूनें वाचलेंहि तें पत्र. दहापांचच ओळी होत्या त्या— पण त्या अैकतांच अनुकाकू थंडगार होअून अुभ्या राहिल्या ! त्या पत्राचा सारांश त्यांच्या लक्षांत ठसठशीतपणें आला; तो हा कीं, ब्रम्हावर्ताकडे विष्णुपंत देवधरांच्या चुलत आजोबांच्या कुटुंबापैकीं अेक वृद्ध गृहस्थ, 'दशांत'ला कोणी अेक आप्त, वारला असून त्याला तो चवथा दिवस होता ! अर्थात् चुलत आजेसासऱ्याच्या शाखेकडचें तें सुतक अनुकाकूंनाहि आलेंच होतें ! त्या बातमीनें थोडा वेळ सुन्न होअून अनुकाकू अुभ्या होत्या तोंच काळू तें पत्र गाद्यांच्या ढिगावरच्या फळीवर ठेवण्यासाठीं अुडी मारून त्या गाद्यांच्या ढिगावर चढला ! त्या धक्क्यासरशीं अनुकाकू विंचू डसावा तशा अकस्मात् किंचाळल्या,

" अरे काळ्या, काळ्या, सुतक न मेल्या ! अुतर खालीं ! कालविला ग बाअी विटाळ ह्या कारट्यानं !"

काळू देखील त्या किंचाळण्यानें थोडा दबला, बाजूस झाला. तोंच विष्णुपंतहि बाहेरून घरीं आले. " काय, झालं काय ?" म्हणून आपल्या पत्नीस विचारतांच अनुकाकूंनीं त्या आपल्या पती-कडे जळफळत पाहून बातमी दिली,

"व्हायचं काय ! ते असतात न कोणीसे आपल्या चुलत आजोबांचे भाअीबंद तिकडे ब्रम्हावर्तास ? कधीं तुमच्या वा माझ्या जन्मांत तोंडदेखील पाहिलीं नाहींत अेकमेकांचीं ! त्यांचं कोणीसं मेलं आहे ! बरं, मेलं तर मेलं, नवव्या दिवशीं तरी कळवायचं नं कीं स्नान केलं नी सुतक फिटलं ! पण अुभ्या जन्मांत ज्यांना अेकसुद्धां पत्र टाकायची घाअी कधीं होत नाहीं, त्यांना मरतांना मात्र सगळ्या भाअूबंदांना सात पिढ्यांची ओळख काढकाढून सुतकाचं पत्र टाकायची अगदीं लगिनघाअी होते. आजचा चवथा दिवस सुतकाचा ! तोंच पत्र हातांत ! सहा दिवस आतां असं रखडत कुडकुडत पडायचं ! साधा मेल्यांनो काय गेल्या जन्माचं वैर होतं तें ! अगबाअी, चुलीवरची डाळ करपूं लागली ! अुतरायची तरी कुणीं ती आतां ? भिकी पण अजून येअीना शाळेंतून !"

अनुकाकू अशा जळफळत ठिकच्या ठिकाणीं अुभ्या होत्या तोंवर विष्णुपंत तें पत्र सावकाशपणें वाचीत होते, कांहीं आठवीत होते. त्यांनीं त्यांच्या स्वतःच्या सख्ख्या आजोबानांहि पाहिलें नव्हतें. चुलत आजोबांच्या ब्रम्हावर्ताच्या शाखेचें नांवच काय जें त्यांना ठाअूक होतें त्यापेक्षां कांहींअेक, ओळख नव्हती. कांहीं वर्षांपूर्वीं असेंच अेकदां कुणी तिकडे वारलें होतें तेव्हां अेकदां सुतक आलें होतें. कुणी मेलें कीं जें कोणाचें पिढींत अेकाददुसरें पत्र येअील तेवढाच काय तो त्या दोन कुलशाखांतील भाअूबंदपणाच पत्रव्यवहार !

अनुकाकू ही अेक देवलसी सोंवळ्या ओंवळ्याची आवड नी विटाळचंडाळाचा तिटकारा असलेली सुशील बाअी होती. जितकी प्रेमळ तितकीच तापट. विष्णुपंत त्या आपल्या बायकोच्या लहरीलहरीनेंच घरांतले व्यवहार ठेवीत. त्यांचें सोंवळेंओंवळें फार कडकहि नसे, अगदींच सुटलेलेंहि नव्हतें. त्यांच्या त्या पत्नीला— अनुकाकूला —अलीकडे ताप येत असे, त्यामुळें त्या जास्तच

चिडचिडया झाल्या होत्या. पण घरांत मोलकरीण अित्यादि ठेवण्याची शक्तीहि त्या कुटुंबास नसल्यानें नी अनुकाकूच्या सोंवळयालाहि तें परवडणारें नसल्यामुळें त्या घरचें सारें काम स्वतःच करीत. आणि त्यामुळें त्यांचा ताप अधिकच रेंगाळून प्रकृति खालावत चालली होती. हें सुतकाचें विघ्न येतांच नेसलेल्या सोंवळयासुद्धां जिकडे तिकडे त्यांना विटाळच विटाळ दिसूं लागून त्या भांबावल्यासारख्या झाल्या. चुलीवरची डाळ जों जों करपत चालली तों तों त्यांची बारा वर्षांची मुलगी भिकी शाळेंतून येण्यास किती अुशीर करते याचा त्यांना अनावर राग येअूं लागला.

शेवटीं अेकदांची भिकी आली. भुकेलेली, नेहमींप्रमाणें येतांच दप्तर फेंकून लडिवाळपणें कुरकुरतच आअीजवळ गेली, 'काकू खायला दे न आधीं कांहीं!' तोंच वसकन् तिच्या अंगावर अनुकाकू आल्या, 'अग शिवशील! शीवशील! भिके! खा मेल्यांनो मलाच अेक-दांचं. हट् मागं, मी सुतकी आहें!'

बिचारी भिकी मागें हटत, हा सुतकाचा विटाळ म्हणजे काय अरिष्ट आहे काय कीं, अशी घाबरून पाहूं लागली. ती मुलगी असल्यामुळें तिला सुतक नसतें, स्वतः आंघोळून आतां तिनेंच काय येअील तसा सैंपाक करायचा नी सहा दिवस सुतक फिटेतों सारा पाणी-झाडलोटीसुद्धां संसार चालवावयाचा ही गोष्ट अनुकाकूंनीं समजावून देतांच जड पावलांनीं तें बारा वर्षांचें लेंकरूं चुपचाप कामाला लागलें. अनुकाकू एका दूरच्या कोंपऱ्यांत राहून भिकीला आज्ञेमागून आज्ञा सोडीत नी दर पळादोंपळामागें 'अग शिवशील!' म्हणून ओरडत काम करवीत बसल्या.

प्रत्येक पावलाच्या विटाळाचें, पदार्थाच्या विटाळाचें धर्मशास्त्र स्वतंत्र– सामान्य तत्त्व, नियम असा नाहीं. गव्हाला विटाळ नाहीं, ते निवडायचे, पण कणकीला विटाळ, ती शिवायची नाहीं; नदीला विटाळ नाहीं, विहिरीला विटाळ; विहिरींतल्या बेडकांचा, माशांचा

पाणी लाटतांना माळरहाटगाडग्यावर बसत्या अुडत्या कावळ्याचा विटाळ नाहीं, माणसांचा विटाळ; कोऱ्या कपड्यांना विटाळ नाहीं, धुवटांना विटाळ; तेल खायचें, तूप नाहीं; गोमूत्र प्यायचें, गोदुग्ध नाहीं; अुपरण्याची फेट्यासारखी टापशी बांधायची, फेटा व पागोटें घालणें नाहीं; कोरड्या भुअीवर सैंपाकघरांत पाय पडला तरी विटाळ नाहीं, ओल्या भुअीवर पाय पडतां कामा नाहीं;– असे पोथींतले नी पोथीबाहेरचे अनुकाकूंना रूढि म्हणून सासर माहेरीं पाठ असलेले धर्मशास्त्राचे असंख्य नियम पावलोपावलीं मोडतांना नी पाळतांना बिचाऱ्या लहानग्या भिकीला जीव नकोसा झाला! तिला सुतक नव्हतें तरी काळूला होतें!

काळू हा अेक अुपजत सुधारक होता. सहजगत्या हंसत हंसत भिकीला थापटी मारून जाअी– काकूची दृष्टि चुकवून! पण दिवसांतून चारपांच वेळां तरी काकूच्या दृष्टीस भिकी सुतकाच्या विटाळलेल्या पदार्थांना वा सुतकी काळू भिकीला गमतीनें शिवतांना दिसेच, कीं अनुकाकूंच्या शिव्याशापांच्या वर्षावांत बिचाऱ्या भिकीला पहिल्यानें तापावें लागून मग थंड पाण्यांत सचैल आंघोळून कुडकुडावें लागे! ते दिवस कडाक्याच्या थंडीचे! पण अनुकाकूच्या सुतकशास्त्राचें विधान स्पष्ट होतें. थंड पाण्याच्या स्नानानेंच काय तो विटाळ जाअू शकतो– अुष्ण पाण्यानें नाहीं! भिकी अवघी बारा वर्षांची शाळकरी पोर! ती सैंपाक ती काय करणार, मोठीं भांडी काय अुचलणार, सोंवळ्यांतलें पाणी तें काय भरणार? पण कच्चेंपक्कें कांहींतरी शिजवून त्या कुटुंबाचा संसार तिलाच चालवावा लागला. काळूची मात्र चैन होती. अनुकाकूंना तो भंडावून सोडी. गाद्यांच्या ढिगावर मधां काळू चढला होता; अनुकाकूंनीं शास्त्रार्थ सांगितला कीं, 'भिके, गाद्या कांहीं धूत नसतात, त्यावर गोमूत्र शिंपडलें कीं झालें; पण त्यांच्यांतल्या चादरी तेवढ्या धुवायला काढ.' काळूचें मत कीं, धुवायच्या तर गाद्याहि धू, नाहींतर चादरीवरहि गोमूत्र

शिंपडलें कीं विटाळ गेला पाहिजे ! अनूकाकूंनीं तें मत विचारांत न घेतां गाद्यांवर गोमूत्र शिंपडणेंच पुरें असें ठरवून त्या शुद्ध केल्या. हें पाहून, काळू अेका हातांत गोमूत्र घेऊन गाद्यांच्या ढिगावर जाअून पुनःपुन्हा नाचे ! अनूकाकू ओरडत धांवल्या कीं, हातांतील गोमूत्र शिंपडून म्हणे, 'बघ, गेला त्यांचा विटाळ ! अगदीं तुझं शास्त्र पाळतों बरं !' अशा वेळीं मात्र काळूला दोनचार चापट्या खाव्या लागत. तेव्हां कोणच्या तरी पोथींत सुतकामध्यें चापट्या मारूं नयेत असाहि नियम लिहिला असता तर त्यांत कांहींतरी अर्थ असता असें काळूला वाटल्यावांचून रहात नसे.

सुतकामध्यें साखर खाअूं नये हा नियम मात्र अनुकाकूंनीं अेका प्रकरणापुरता कलिवर्ज्यांत काढला होता. त्या म्हणत, चहांत साखर खायला हरकत नाहीं; नुसती साखर खाअूं नये. काळूचें मत अर्थातच असें पडे कीं, दोन्ही प्रकरणीं साखर खावी किंवा खाअूं तरी नये. अनुकाकू आपल्या तत्त्वाप्रमाणें सुतकांत चहा पीत. काळू आपल्या तत्त्वाप्रमाणें चहाच्या वेळीं अुघडपणें काकूसमोर, नी नुसती साखर गुपचूपपणें काकूच्या आड भिकीला पाणी भरण्यास सहाय्य देअून त्याचें मूल्य म्हणून घेअी नी खाअी.

विष्णुपंत अेक शांत स्वभावाचे, आपल्या बाहेरच्या कामांत गढलेले, नी घर अनुकाकूच्या हातीं देअून टाकलेलें बापडें माणूस. ते अनुकाकूंच्या तत्त्वांप्रमाणें अनुकाकूस वागूं देत, भिकीच्या तत्त्वांप्रमाणें भिकीला, काळूच्या तत्त्वांप्रमाणें काळूला. आपण स्वतः घरीं अनुकाकूंच्या कलाप्रमाणें नी बाहेर त्यांचे मित्र डॉ. पुरंदरे यांच्या कलाप्रमाणें वागत.

त्याच डॉ. पुरंदऱ्यांकडे आज विष्णुपंतांना जाणें अवश्यहि झालें. तीं थंड पाण्याचीं स्नानें, ती झाडलोट, पाटपाणीं, चूलपोतेरें नी दोन सांजा सैंपाक ही सारी खटपट त्या बारा वर्षांच्या भिकीला न झेंपल्यामुळें तिला तिसऱ्या दिवशीं ताप भरला. अिकडे अनुकाकूंच्या



" म्हणूनच मी शिवूं देणार नाहीं." अनुकाकू म्हणाल्या.

अंगीं तर आधींच मुरलेला. त्यांत चटईवर थंडींत निजणें, गार पाण्यानें आंघोळणें, भिकीचें कच्चेंपक्कें जेवण खाणें, पथ्य तें सोडून जें कुपथ्य तोच सुतकांतला धर्म ! त्यापायीं अनुकाकूंचा तापहि बळावला ! अंगाला सारखी ठणक. पण सुतकांत गादी न घेतां चटईवर पडून दिवसरात्र कण्हत राहिल्या. घरांत ही दुर्दशा पाहून कामकाज संपल्यावर तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं विष्णुपंत नोकरीवर आले तेव्हांपासून त्यांच्या ओळखीचे नी विश्वासाचे जे अेकच गृहस्थ होते त्या डॉ. पुरंदऱ्यांकडे कांहीं औषध मागावयास नी थोड्या गप्पाहि छाटावयास गेले. सुतकापायीं घरीं किती अड-चण आली आहे तें विष्णुपंतांनीं सांगितल्यावर डॉ. पुरंदरे तिथें बस-लेल्या आपल्या दोघां स्नेह्यांकडे वळून म्हणाले,

'पाहिलंत ना ? ही सुतकाची आजची रूढि किती अर्थशून्य नी त्रासदायक झालेली आहे ती ? काय गोपूशास्त्री, सुतकांत साखर खाअूं नये, गादीवर निजूं नये, घराबाहेर पडूं नये, थंडी असो नसो गार पाण्यानंच अंघोळावं, व कपड्यांचे ढीग स्वच्छ असले तरी बोट लागलं म्हणून धुवावे आणि एका मनुष्याचा जीव गेला म्हणून दहा जिवंत माणसांना जीव नकोसा करावा, हा काय धर्म म्हणावयाचा ? ज्या रूढीच्या योगें लवलेश सामाजिक असा लाभ न होतां मनुष्य-मात्रास निष्कारण त्रासच त्रास होतो, तो अधर्म होय ! — ही सुतकाची रूढि त्यापैकींच अेक अगदीं बुद्धिशून्य भाबडटपणाची आहे.'

गोपूशास्त्री अुपहासले, 'तर तुमचं म्हणणं काय कीं, आपले प्रिय मनुष्य मेलं म्हणजे दुःखी नातलगांनीं बासुंदी, दूध, जिलब्या लाडू, पेढे यथेच्छ खातपीत गाद्यागिरद्यांवर लोळावं ? अहो, ज्याचा कोणी प्रियजन मरतो त्याला साखरच सोमलासारखी लागते, हंसूं येतच नाहीं, सुखोपभोग विषवत् होतात ! ह्यालाच आम्हीं माणु-सकी वा मनुष्यधर्म म्हणतों ! तिलाच सुतकाची रूढि म्हणतात, शास्त्र म्हणतात !'

डॉ. पुरंदरे हंसले, 'अहो अियंच तर मेख आहे. दुःख मानण्याचं शास्त्र– दुःख मानण्याची रूढि, या दोन परस्पर विरुद्ध शद्वांतच सुतकाच्या आजच्या ढोंगधत्तुऱ्याचं तुम्हीं, मला केव्हांहि करतां आलं नसतं असं, विडंबन केलं आहांत!'

'डॉ. पुरंदऱ्यांच्या म्हणण्याचा प्रत्यक्ष पुरावा हवा असल्यास आमच्या राणीमहाशय नी युवराज काळू यांचीच साक्ष काढा! सुतक आल्याचं पत्र येतांच माझ्या पत्नीच्या डोळयांत टच्कन् पाणी आलं– पण तें माझ्या चुलत आजोबांच्या शाखेंतील अेक म्हातारे गोत्रज मेले म्हणून दुःखानं नव्हे!– तर ते मेल्याचं पत्र नवव्या दिवशीं आमच्या हातीं पडेल अशा बेतानं न टाकतां आम्हांस सहा दिवस सुतकांत खितपत पडावं लागेल अितक्या लवकर त्यांनीं टाकलं या रागानं फणफणल्यामुळं! 'काय गेल्या जन्मीचं वैर होतं तें साधा मेल्यांनो!' हाच आमच्या तापट राणीमहाशयांचा सुतकाची बातमी कळतांना टाकलेला पहिला दुःखाचा सुस्कारा! रूढि झालेलं दुःख म्हणजेच दुःखाचा मिथ्याचार! लवलेश दुःख नसतांना माझी बायको स्वतः आणि लेंकरू तापानं आजारी पडण्याइतकी जी सुतकाची दगदग अगदीं मनोभावानं करते आहे ती केवळ सुतकांत तसं करणं हें 'शास्त्र' आहे म्हणून!' विष्णुपंतांनींहि स्वतःचा अनुभव सांगितला.

'पुन्हा असं पहा–' डॉ. पुरंदरे शांतस्वरें म्हणाले, 'अगदीं सख्खी आअी वा बाप वारला तर त्याचं दुःख जसं मुलांना तसंच मुलींनाहि होतं. पण मुलींना, पोटच्या मुलींना सुतक नसतं! आअी वारली तरी मुलींना साखर खायला, गाद्यांवर निजायला धर्माची आडकाठी नाहीं; त्यांच्या कपडयांना विटाळ नाहीं; पण पोटच्या मुलीपेक्षां त्या मृत स्त्रीचं दुःख ज्यांना शतपटीनं कमीच वाटणार त्या चुलतचुलत दीर-जावा प्रभृतींना सुतक कडकपणानं पाळावं लागतं! अुलटपक्षीं ज्याच्याशीं जन्मभर द्वेष, असाहि भाअूबंद मेला

कीं त्याचं मला सुतक; पण माझा अेखादा जिवलग मित्र वा मैत्रीण वारली आणि तिच्या दुःखानं मला जरी जीवनहि नीरस वाटण्याइतकं असह्य दुःख होत असलं, तरी मला त्याचं सुतक नसतं! तेव्हां दुःख होतं म्हणून माणसं शास्त्रोक्त सुतक पाळतात किंवा आजची सुतकाची पद्धत नी त्याची ती विटाळवेडाच्या ब्यादीची सांथ यांचं समर्थन माणुसकीच्या समवेदनेनं होअूं शकतं ही क्लृप्ति, ह्या दोन्हीहि गोष्टी अगदीं लटक्या पडतात.

'बरं, मृत व्यक्तीच्या वियोगानं हळहळून खरोखरच ज्यांना शोक धायधाय रडवीत आहे, विव्हळवीत आहे, त्यांना देखील दहा दिवस ह्या सुतकापायीं आज आम्ही बळेंबळें हाल आपेष्टा भोगणं जें भाग पाडतों—तो तरी धर्म म्हणतां येअील का? तो निव्वळ निर्दयपणा होतो. आरोग्यशास्त्राच्या दृष्टीनं तर अशा शोकविव्हल कुटुंबांतील माणसांची मानसिक व्यथा बरी करावयासाठीं आणि तिच्या पायीं त्यांची शरीरप्रकृति ढांसळून तेहि रोगांना बळी पडूं नयेत म्हणून त्यांना धीर देऊन सत्वस्थ सुग्रास अन्न बळेंबळें जेवावयास वेळच्या वेळीं हवं. थंडी—ऊनापासून बचाव होअील असे कपडे, असं स्नान, बाहेर हिंडणं, फिरणं हेच अुपचार समजून पाडून पाडून करावयास हवे. मायेच्या माणसांनीं त्यांस पोटाशीं घेअून, पाठीवर हात फिरवून, आपल्या घरीं आदरानं नी ममतेनं शेजारीं बसवून, त्यांना कांहीं विरंगुळा पाडला पाहिजे. पण दुःखानं त्यांचीं मनं विव्हळ नी घायाळ जेव्हां झालेलीं असतात तेव्हांच सुतकानं आपण त्यांचीं शरीरंहि विव्हळ नी घायाळ करून सोडतों! अेखाद्या महारोग्यासारखं 'विटाळ विटाळ' म्हणून हडहड करीत कोणी त्यांना शिवणार नाहीं, चटअीवर निजणं, रूक्ष नी वेळीं अवेळीं कोणी दुसरा काय घालील तें खाणं, कामधंदा बंद, घराबाहेर पडण्याची चोरी! जी ती वस्तु मागून घेणं, ताटकळत दिवस रात्र पडणं, ह्या आजकालच्या सुतकाच्या बाष्कळ नी अगदीं अर्थशून्य रूढीमुळं मन नी

शरीर ह्या दोहोंनाहि मनाच्या दुःखाच्या भरीस सुतकाचा कठोर त्रासहि सोसावा लागून अधिकच उदास, भयाण, कंटाळवाणं वाटूं लागतं. रोगापायीं अेकजण मेलं नी सुतकापायीं दोनदोन तीनतीन जणांची प्रकृति बिघडून ते आजारी पडले अशीं कुटुंबं मी अनेकदां पाहतों. तेव्हां प्रियजन मेल्यामुळं जें कुटुंब खरोखरीच दुःखशोकानं विव्हळलं आहे त्यांतील लहान लेंकरापासून थोरापर्यंत सुतकाच्या त्रासानं नसती आबाळ नी विटाळापायीं हडहड करणं अगदीं निर्दय-पणाचं नी त्यांच्या आरोग्यास घातक आहे; म्हणून सुतकाची चाल टाकाअू. आणि ज्यांना मृताचं मुळीं दुःखच नसतं यांच्याकडून दुःखाचं नुसतं ढोंग करविणं हा तर निर्भेळ मिथ्याचार; म्हणून सुतक त्या प्रकरणींहि टाकाअू! अहो, धडधडीत भाड्याचीं माणसं आणून प्रेतापुढं पैशापासरीसारखे दर ठरवून रडत ओरडत, छाती पिटीत जाण्याच्या ज्या चाली आहेत, त्या तशा सुतकधर्मास बाष्कळ म्हणूं नये तर म्हणावं तरी काय? 'मोलें घातलें रडाया, नाहीं असूं आणि माया' अशी ही चाल आजहि शेंकडों लोकांत अगदीं तुमच्याअिकड-च्या विटाळवेड्या सुतकी चालीसारखीच 'धर्म' म्हणून अक्षरशः पाळली जात आहे! सुतकांत जी विटाळाची सांथ घरींदारीं आप-णास पछाडते— तो तर अेक निव्वळ भ्रमिष्टपणाच नव्हे काय?'

'काय? डॉक्टर! आतां मात्र तुम्ही पुरते वहावत चालले अहां अं!' तिथें बसलेले अेक समाजशास्त्रज्ञ बी. अे. (ऑनर्स) आश्चर्यून मध्येंच म्हणाले, 'अहो, युरोपांतील साहेब लोकदेखील आमच्या सुतकांतील विटाळ मानण्याच्या आचारास आजकाल प्रशं-सीत आहेत! मृत्यु घडतो त्या कुटुंबांत नी घरांत जें बिघडलेलं वातावरण असतं त्याचा संपर्क समाजांत फैलावूं नये यास्तव त्या कुटुंबास कोणी शिवूं नये, त्यानीं दहा दिवस घराबाहेर पडूं नये, त्यांचे कपडे धुवून घ्यावे अित्यादि नियम आमच्या त्रिकालदर्शी पूर्व-जांनीं घातले आहेत महाराज, आहांत कुठं? अहो, गोपूशास्त्र्यांचें,

तें शास्त्रोक्त राहो, पण शहाणे साहेब लोकसुद्धां प्लेगमध्यें क्वारंटा-अीन सेग्रिगेशन प्रभृति जे उपाय योजितात, ते देखील आमच्या सुतकांतील रूढीपासून सुचले बरं का त्यांना? सुतक दहा दिवस स्मृति म्हणते, तें अेक वेळ खोटं म्हणाल, पण क्वारन्टाअीनदेखील दहाच दिवस साहेब लोकांनीं पाळायचं ठरविलं तें खोटं म्हणायची कोणाची छाती आहे? साहेब देखील सुतकाचं समर्थन करतात, समजलांत! समाजशास्त्राचा प्रश्न आहे हा! चेष्टा नाहीं!"

"हो, हो, हो! प्रोफेसर महाशय, खरं सांगूं का, जुन्या रूढीच समर्थणारं तें 'शास्त्रोक्त' अेक वेळ कांहींतरी समंजसपणाचं असतं; पण हें तुमचं 'साहेबोक्तं' त्या रूढीचं असह्य विडंबन करून सोडतं. म्हणे साहेबदेखील सुतकास समर्थितात! साहेबांत कोणी मूर्ख नसतात कीं काय? मेयोदेखील एक साहेबच आहे! तिची निंदा साहेबोक्त असली तरी जशी कपटी, तशीच कांहीं साहेबांनीं आपल्या वेडगळ रूढींची केलेली स्तुतीहि कपटी असते. आम्ही वेडेचार सोडूं नयेत म्हणूनच कांहीं हितशत्रु साहेब त्यांना वाखाणतात. आपण साहेबोक्तं झालं तरी परीक्षून घ्यावं. कुठं पोथीनिष्ठ सुतकाचा विटाळ, नी क्वारंटाईन सेग्रिगेशनची बुद्धि-निष्ठ पद्धत कुठं! सांथीच्या रोगानं मृत्यु झाला तर क्वारंटाअीन सेग्रिगेशन अुपयोगी, पण कोणाचाहि मृत्यू साप डसून, खड्ड्यांत, पडून, मोटार-अपघातांत झाला तरी सुतकाचा विटाळ धर-तात. पुन्हा अगदीं प्लेगनं वा महामारीनं घरांत बाप मेला तरी मुलांना सुतक—पण बापाच्या अुशाशीं बसलेल्या मुलींना नाहीं! मुलींच्या सर्वत्र वावरण्यानं काय सांथ फैलावत नाहीं? विष्णुपंतांचा कोणीतरी आप्त मेला ब्रह्मावर्ताला—नी विटाळ विष्णुपंतांच्या नी त्यांच्या गोत्रजांच्या कुटुंबांस पाळावा लागतो पुण्याला—मद्रासेला—सिंघला विलायतेला! आप्त मेल्याचं पत्र गोत्रजांतच तेवढं सांथ पसरवीत जातं! तें पोंचतांच दूर देशीं केवळ त्या ठराविक नात्याच्या

माणसांत तेवढे रोगाणू सळसळुं लागावे नी त्याच घरीं तेच जलवायू सेवणाऱ्या अितर, रहात्या माणसांना मात्र त्यांनीं बाधूं नये ? हें काय वैद्यक कीं वेड ? सुतक येअील त्या घरीं मृत्यु घडो न घडो, त्या माणसांनीं म्हणे घराबाहेर पडूं नये. पण गांवच्या वाटेल त्या माणसानं त्यांच्या घरीं सरसहा येत-जात, खात-पीत रहावं हें सुतकाचं शास्त्र; हें काय सेग्रिगेशनचें तत्त्व ? प्लेगची सांथ काय घरचा मनुष्य बाहेर गेला म्हणजे तेवढी पाळीव कुत्रीसारखी त्याच्याबरोबर जाते, पण बाहेरचीं माणसं घरीं आलीं तर त्यांच्या मागं जात नाहीं, त्यांना चावीत नाहीं ? भयंकर सांथींतहि सुतकाचा तोच ठराविक खाक्या ! दहाव्या दिवशीं गोमूत्र थोडंफार शिपडलं कीं "शुद्ध" झालं घर, कपडे, माणसं, सगळं ! पण याला का 'डिसअिन्फेक्शन' म्हणायचं ? कौलारं अुलथून, कडक जंतुघ्नें फवारून, औषधीय धुरांनीं कपडेलत्ते, वस्तु वाफाळून ज्या सांथीला आंवरतां येत नाहीं, ती काय घरांतल्या वाटेवर चार थेंब गोमूत्र शिंपडून पळवितां येते ? 'विटाळ' म्हटला कीं, ही धर्मभोळेपणावर आधारलेली भावना; डिसअिन्फेक्शन–क्वारंटाअीन प्रभृति 'निरोगीकरणा'चीं साधनं वैद्यकाचे प्रयोगसिद्ध अुपाय ! सुतकाच्या चालीशीं वैद्यकीय हेतूंचा मूळ संबंध असा नाहींच ! मूलतः ती चाल धार्मिक, परलोककल्पनामूलक !'

**विष्णुपंत**– हेंच कारण माझ्या ध्यानांत आलं होतं बरं का डॉक्टर, जेव्हां मी अीजिप्त प्रभृति देशांतील 'ममीं'ची नी 'पिरामिड्'ची माहिती प्रथम वाचली तेव्हां अं ! मेलेला राजा वा रंक परलोकांत जातांच अिथला संसार असाचा असाच पुढं थाटतो ही पूर्वीची धार्मिक समज असं म्हणूनच मनुष्य मरतांच त्याच्या थडग्यांत, ताटवाटी, कपडे, दिवे, पलंग ज्याची जशी शक्ति तसं पुरीत, परगांवीं बिऱ्हाड करतांना जसं आपण निवडक सामान बरोबर देतों.

**डॉ. पुरंदरे**– घरगुती सामान नव्हे तर माणसंहि ! पूर्वकालीं कोणी मेला कीं त्याच्या थडग्यांत त्याच्या गुलामांनाहि

जिवंत पुरीत. थोर राजे असले तर त्यांच्या आवडत्या बायकांनाहि जिवंत पुरीत ! जपानसारख्या देशांत सम्राट मरतांच त्याचा सेनापति प्रधान, मंत्री, अजूनहि जी क्वचित् 'हरकारी' (स्वतःच भोंसकून घेऊन प्राणार्पण) करतो ती देखील अतिप्राचीन अशा ह्याच सुतकी भावनेची अुरलेली स्मृति होय. पूर्वी असं मंत्रिमंडळदेखील राजाबरोबर परलोकीं धाडीत ! आमच्यांत प्रेताबरोबर सती जाणारी पतिव्रताहि परलोकीं पतीच्या संसारांत गृहिणीची तूट पडूं नये याच मूळ भावनेची 'अुदात्तीभूत' (Sublimated) साक्ष होय. जी प्रेमविव्हल होअून प्रियासाठीं प्राणार्पण करी, तिची गोष्ट न्यारी; तसं प्राणार्पण आअी आवडत्या लेंकराच्या वियोगानं, वीर कीर्तीसाठीं, हुतात्मे ध्येयासाठीं करतात ! ते निराळं. पण सुतकांतील 'कर्तव्य', 'शास्त्र' रूढि म्हणून ज्या स्त्रियांना सती जावं लागे, मृताला थंडींत अुपयोगी पडेल म्हणून घोंगडी, टेकावयास काठी, दुधास गाय जी भटास द्यावी लागते, ती ह्याच भावनेचा अवशेष ! त्या काळीं सायकली नव्हत्या, नाहींतर मृतास परलोकींच्या सडकांवरून झटपट जातां यावं यास्तव भटास अेकेक सायकल द्यावी असंहि वचन गरुडपुराणांतील सुतकशास्त्रांत सहज सांपडूं शकतं ! मुसलमान ख्रिश्चनांचें सुतकी आचारहि त्याच आदि मानवांच्या धर्ममतांचे अवशेष. त्यांचीं थडगीं पिरामिडस्‌ची अगदीं औरस संतति ! थडग्यांत कृमीकीटकांनीं रक्तमांसहृदय भक्षिलं तरीहि अस्थिपंजर जे अुरतात, त्यांत जगाच्या शेवटच्या दिवशीं श्वास फुंकून अीश्वर सर्वांना पुन्हा जिवविणार नी त्यांचा न्याय होणार ही मूळ भावना ! सारांश कीं मनुष्यजातींत जे सुतकीय आचार आज शास्त्र म्हणून रूढ आहेत, त्यांच्या बुडाशीं वैद्यकीय वा वैज्ञानिक अशी कोणचीहि कसोटी नसून ते मुख्यतः पारलौकिक नी जुनाट अशा धर्मकल्पनांचे भाबडे अवशेष आहेत. पूर्वीच्या ज्ञानाच्या नी अज्ञानाच्या मानानं पूर्वी ते शोभून गेले असं समजून तो प्रश्न टाळला, तरीहि आतां यापुढं तरी आपले सुतकाचे आचार आजच्या विज्ञानाच्या नी वैद्यकाच्या कसोटीस लावून,

समाजहिआर्थ अुपयुक्त ठरतील तसेच नी तेच काय ते ठेवावेत. हें विटाळवेड तर तत्काळ सोडून द्यावं.

**विष्णुपंत-** पण मृताच्या स्मृति प्रीत्यर्थ अेक सामाजिक संस्कार म्हणून तरी सुतक हवं, नव्हे काय?

**डॉ. पुरंदरे-** अवश्य. तेवढाच त्याचा अुपयोग. पूर्वी राजा प्रभृति कांहींजण मेले म्हणजे वर्षसहा महिने सुतक असे. सुतकाच्या अशा चाली समाजव्यवहारांत अत्यंत त्रासदायक होतील, हें स्पष्टपणानं सांगून कित्येक स्मृतींतून राजा, मंत्री, सैनिक, शिल्पी प्रभृतींना 'सद्यःशौचाः प्रकीर्तिताः' म्हणून वगळून समाजाचीं कामं बंद न व्हावींत अशी सोय केली, लांब सुतकंहि बंद केलीं. तीच विचारसरणी पुढं चालवून आतां आपण बाकीच्या विटाळादि चालीहि सोडाव्या. ज्यायोगें मृताच्या शोकानं विव्हळलेल्या कुटुंबीयांचं आरोग्य बिघडणार नाहीं, त्यांच्या हळुवार मनास विरंगुळा पडेल, मुलांलेंकरांचे हाल होणार नाहींत, अशी त्यांची शुश्रूषा आप्तेष्टांनीं ठेवावी. वैद्यकीय दृष्ट्या अवश्य तितकी साफसफाअी जंतुघ्न निरोगीकरण प्रभृति अुपायांनीं गृहशुद्धि वा मनुष्यशुद्धि व्हावी, तो प्रश्न डॉक्टरवैद्यांचा— भटाभिक्षुकांचा नव्हे. जो मृत त्यांची साधार कुळकथा नी नातं हीं कुटुंब एकत्र जमवून सांगावीं, त्याचे गुण गावे, त्याच्या नांवें यथाशक्ति कांहीं रक्कम अेखाद्या समाजहितकारक संस्थेस वा सुयोग्य नी सत्पात्र अशा विद्वानास वा विद्यार्थ्यासि दान द्यावी. समाजीय प्रदर्शनार्थ सुतकाचं निदर्शक म्हणून अेखादं त्रासदायक नसलेलं बाह्य चिन्ह दहा दिवस कुटुंबीयांनीं वा दुःखितांनीं वापरावं. थोडक्यांत म्हणजे सार्वजनिक मनुष्य मेला असतां आज सार्वजनिक सुतकं आपण जशीं केवळ दुःख-प्रदर्शक, स्मृतिमूलक नी कृतज्ञताव्यंजक अशा जनिक (Public) हेतूनंच नी पद्धतीनंच काय तीं पाळतों तशींच कौटुंबिक सुतकंहि पाळावीं.

**विष्णुपंत**– अहो, पण हें तत्त्वज्ञान आतां आमच्या घरापुरतं कसं व्यवहारवायचं ? आम्ही आतां विटाळवेड सोडलं बघा; पण आमच्या सौभाग्यवती त्या तापांत तशाच चरफडत राहतील, प्राण सोडतील, पण सुतकाची चाल सोडणार नाहींत ! खरोखर या सुतकापायीं खरा त्रास घरच्या बायकांनाच होतो; पण त्याच सुतक पाळण्यांत अगदीं सुतळीचा फरक पडूं देणार नाहींत !

**डॉ. पुरंदरे**– अेकंदरींतच तसं. बायकांचा छळ करणाऱ्या रूढि मोडण्यांतहि खरी अडचण बहुधा बायकांचीच येते. सुधारणांना नाक मुरडण्याकरितांच देवानं आपलं नाक वर केलं असावं अशी बहुतेक स्त्रियांची समज दिसते. बरं आज हीं दोन औषधं तेवढीं तुमच्या कुटुंबाला नी मुलीला द्या, अुद्यां मी येतों नी स्वतः प्रकृति पाहातों.

० ० ०

दुसऱ्या दिवशीं डॉ. पुरंदरे विष्णुपंतांच्या घरीं जाअून पाहातात तों अनुकाकूंचा ताप भलत्याच थरास चाललेला, छातींत कळ मारीत आहे. त्यांना नळी लावून परीक्षावयास डॉक्टर जाऊं लागले तों अनुकाकूंनीं शिवूं देण्याचें नाकारलें. चटअी-चवघडीचीं टोंकें आंखडून आंवरून ‘ कूर्मोंऽङ्गानीव सर्वशः ’ अशा त्या हटून बसल्या. डॉक्टर म्हणाले, ‘ अहो, मला विटाळ होअील, तुम्हांला नाहीं ना ?’ अनुकाकू म्हणाल्या, ‘ म्हणूनच मी शिवूं देणार नाहीं. कारण तुम्ही स्वतः आंघोळणार नाहीं नी गांवभर विटाळ कालवाल !’

भिकीहि तापानें फणफणतच होती. आतां दहावा दिवस अुजाडतो केव्हां असें विष्णुपंतांस होअून गेलें. काय अुपचार ते अनुकाकूला त्यानंतरच करतां येणार. अशक्त, अुठवेना ! पण ती तशीच अुठून सारीं आन्हिकें करी. शेवटीं चक्कर आली. रात्रीं अेक वातासारखा झटका ! पण तोंच पहांटे अेकदांचा दहावा दिवस अुगवला. त्यासरशीं त्या दुःस्थितींतहि अनुकाकू अगदीं फुटवें न

फुटतें तोंच अुठली, आपलें अंथरूण पांघरूण काखोटीस मारलें, आणि दिसूं लागल्यावर कुणीं आपणास घरीं थंड पाण्यानें न्हाअूंधुअूं देणार नाहीं, सारा विटाळ कालवील, या भयानें तशा पहांटेस जावयास निघालो– गांवच्या नदीवर !

तिथून तिला परत घरीं जेव्हां आणली तेव्हां अुचलून आणली ! डॉक्टरांनीं औषधपाण्याची पराकाष्ठा केली; पण वाताचा झटका अुतरेना. कोणी दिसलें कीं, अनुकाकू बेफामपणें किंचाळे, 'अरे दूर ! शिवशील ! सुतक !'

पहिल्या सुतकाच्या बाराव्या दिवशीं अनुकाकू वारली नी विष्णुपंतांस दुसरें नी खरेंखुरें सुतक आलें. दु:खाची नी दुर्दशेची त्यांच्या घरावर खरीखुरी सुतकी छाया पडली. पण त्यांना नी त्यांच्या दोन्ही लेंकरांना डॉक्टर पुरंदऱ्यांनीं आपल्या घरीं आणून पहिल्या दिवसापासून कोणचीहि विटाळ-फिटाळ हडहड न करतां आपल्या कुटुंबांत बरोबरीनें सांत्वन-सांभाळ केला म्हणून निभावलें.



# चातुर्मास्य !

( रांगोळीची करंडी घेऊन रखमाबाअी येतात आणि " वन-वासी राम माझा । सांगा कुणीं पाहिला ।। " हें गाणें गुणगुणत गोपद्में रांगोळीनें काढीत बसतात. इतक्यांत सकुताअी, लीला, शालिनी, मालिनी, सीता प्रभृति स्त्रिया येतात. त्यांस रखमाबाअी स्वागतितात. )

**रखमाबाअी**– या या सकुताअी, लीला– या अशा, कुणी अिथं बसा, कुणी अिथं बसा. या ! (पुन्हा गोपद्में काढूं लागतात.)

**सकुताअी**– हें काय चाललं आहे रखमामावशी ?

**रखमाबाअी**– अग, या चातुर्मास्यांत मीं कनी गोपद्मांचं व्रत धरलं बरं. अग, पण ती कमला नाहीं आली ती कुठं तुमच्या-बरोबर आज ? किती बातरी आहे ग ती ! आली कीं कुठलं मेलं तें हिंदुसंघटण कां कायसं आहे नं तें काढलंच तिनं !

**सकुताअी**– मग त्यांत हो काअीट तें काय आहे रखमा-मावशी ? ती जरी वयानं लहान असली नं तुमच्याहून, तरी तिचे विचार किती पोक्त असतात ! तुमचं हो वय काय रखमामावशी आतां ?

**रखमाबाअी**– आमचं काय बाअी ! दहा गेले नी पांच राहिले ! ( बोटें मोजून ) बघ, तीन सिंहस्थ मला अगदीं चांगले आठवतात. मग तूंच पहा आपली आतां माझं वय काय असेल तें !

**सकुताअी**– आतां मला जर तिशी उलटली, तर तुम्ही साठीच्या जवळ असणारच मावशी ! अहो, आलीच वाटतं ती कमला ! हांक मारते आहे ! ओ !— या या, दार लोटलेलं आहे हो नुसतं. अुघडा, या आंत. ( कमला येतांच ) या शिक्षकीण बाअी ! बसा अशा.

**कमला**– काय रखमामावशी, कसं काय आहे ? हें काय करतां आहां ?

**रखमाबाअी**– अग, हीं गोपद्मं काढतें आहे मी. चातुर्मास्यांत गोपद्मांचं व्रत फार पवित्र. १०८ गोपद्मं प्रत्यहीं रांगोळीनं काढावीं मग त्यांची पूजा करावी, स्वतः सोंवळ्यानं सैंपाक करून पक्वान्नांचं पान वाढून गोठ्यांत जावं, गाअीला हळदकुंकू लावून फुलांची माळ घालून सोंवळ्यानं आपल्या हातीं गोग्रास घालावा आणि मग जेवावं अशीं १०८ गोपद्मं— अग, म्हणजे गाअीच्या खुरांचीं हीं अशीं चित्रं चार महिने काढलीं नं म्हणजे गोलोक नांवाचा स्वर्ग १०८ वर्षं जिवाला भोगायला मिळतो ! हो पण व्रत संपतांच दहा तरी भट जेवायला बोलावून प्रत्येकाला अेकेक सोन्याचं गोपद्म दिलं पाहिजे हो !— नाहीतर नाहीं स्वर्ग मिळणार ! अग कमळे, तुला कांहीं व्रत नको का धरायला आतां ? शिक्षकीण झालीस म्हणून काय झालं ! अग, देवाची सेवा कांहीं करावी, कांहीं धर्म आचारावा ! तूं पण हें गोपद्मांचंच व्रत धर पाहूं.

**कमला**– पण प्रत्यहीं गायीसारख्या अेका पशूच्या खुराची १०८ चित्रं काढल्यानं आणि भटांना सोन्याचीं गोपद्मं दिल्यानं देवाची सेवा ती काय साधणार ? धर्म तो काय घडणार ? धर्म म्हणजे परोपकार. परोपकारः पुण्याय ! तेव्हां ह्या लोकीं कांहीं प्रत्यक्ष असा परोपकार घडेल असं व्रत करणं बरं. तसं अेक व्रत मीं धरलं तर त्यांत नाहीं का देवाची सेवा घडत ?

**रखमाबाअी**– लागलीच पाचकळपणा करायला ! अग, गायीची सेवा तीच देवाची सेवा. भाव ठेवावा तिथं देव आहेच ! पोथींतच आहे हो हें सारं !

**कमला**– होय ना ? मग जर पशूंत भाव ठेवला तरी देव पावतो, तर आपल्या ह्या हिंदुराष्ट्राच्या भावाबहिणींची, माणसा-सारख्या माणसांची सेवा देवाच्याच नांवं केली तर काय तो पावणार नाहीं ? नरांची सेवा तीच नारायणाची सेवा, हेंसुद्धां पोथीच सांगते !

**सकुताअी**– हें अगदीं खरं हो कमलाताअी. मी तसं व्रत धरतें. या लक्ष दुर्वांपेक्षां तोच खरा परोपकार, खरी देवसेवा, कोणचं धरूं ?

**कमला**– असं बघा सकुताअी, अेका बिहारच्या भूकंपांत अनाथ अशीं हिंदूंचीं तीन हजार बाळं मिशनरी मौलवींनीं नेलीं, बाटवलीं, त्यांचे आअीबाप त्यांना मुकले. अितकंच नव्हे, तर हे तीन हजार वंश पुढील पिढीपासून हिंदूंचे कट्टर शत्रु होणार. आपल्या हिंदुराष्ट्राचं संख्याबळ अशा प्रत्यहींच्या धुडगुसापायीं कोटीकोटींनीं घटत असतां, हिंदुधर्माचं खरं व्रत म्हणजे लाख लाख दुर्वांच्या गवताचे भारे देवाच्या नांवं बांधीत बसणं नसून अशी अेकेक अनाथ हिंदु बालबालिका वांचविणं हेंच होय. पण यासाठीं हिंदुसभेनं काढ-लेल्या अनाथालयांना भीकदेखील कोणी घालीत नाहीं ! आम्ही देखील दरिद्रि; अशा हिंदु अनाथालयांस पैसा कुठन देणार ! पण

आपलं शरीर तरी हिंदुसंघटनाच्या अशा पवित्र कार्यासाठीं कष्टविणं आपल्या हातचं आहे, हेंहि तपच आहे, आशा हेतूनं आम्हीं दहापांच मैत्रिणींनीं असं व्रत धरलं आहे कीं, प्रत्यहीं आमच्या येथील हिंदु-सभेच्या अनाथालयांत दोन तास जाअून तेथील लेकरांना अंगेजणीनं आंघोळून, जेववून, त्यांचे कपडे घरच्या साबणानं धुअून परीटघडी-सारखे चक्क करून ठेवायचे आणि दर रविवारीं त्यांना हिंदु वीर पुरुषांच्या सोप्या कथा सांगायच्या. विज्ञानाचे चमत्कार, खेळीव विमानं, यंत्र, ध्वनिक्षेप यांचीं खेळणीं देऊन, समजून सांगायचं. झाडझूड करुन मळ देखील आम्हीच काढतों.

**रखमाबाअी**– अश्श ! कुठलीं मेलीं तीं बिनवारशी पोरटीं ! ना जात ना पात ! त्यांचा मळ काढायचा नी गदळ कपडे धुवायचे ! भंगिणी आहांत कां धोबिणी !

**सकुताअी**– असं कां म्हणतां रखमामावशी ? अहो, आपण आपल्या घरच्या लेंकरांच्या मळानं लडबडलेलीं चिरगुटं नाहीं का धूत ? कुटुंबांतल्या लेंकरांचा मळ काय सोन्याचा असतो ? हिंदुराष्ट्र हेंहि आपलं अेक मोठं कुटुंबच आहे हो ! मी तरी असंच हिंदु-संघटनाचं कांहीं सेवाव्रत धरणार. त्या अनाथालयासाठीं सांगा ना कमलाताअी मी काय करूं ?

**कमला**– तुम्ही ? अहो खरंच. तुम्हाला फक्कड शिवणकाम येतं नाहीं का ? बस्स. तर तुम्ही असं करा कीं, चातुर्मास्यांत निदान शंभर झबलीं नी सदरे त्या अनाथालयास धर्मार्थ शिवून द्या फुकट ! तें सहाय्य त्या संस्थेची केवढीतरी चिंता दूर करील !

**सकुताअी**– हो, हो ! पण बाअी कापड कुठलं विकत आणूं मी अितकं !

**रखमाबाअी**– मी देतें बरं तुला कापड. या माझ्या १०८ गोपद्मांमागं १०८ मुलांच्या झबल्यासदऱ्यांचं कापड मी देअीन हो

धर्मार्थ. मग तर पावेल ना मला सुद्धां तो तुझा हिंदुसंघटन-देव ? अग, हंसतां काय अशा ! हिंदुसंघटन हाहि अेक देवच आहे बरं. गणपति म्हणजेच गणांचा पति, संघटनाचा देव. अग, आम्हांला कळत का नाहीं हें ? पण आम्ही आपलीं जुनीं माणसं. तुमच्या नव्या कल्पना आम्हांला आमच्या जुन्या भाषेंतच सांगितल्या म्हणजे लवकर पटतात हो. मी हीं आपलीं १०८ गोपद्मं पूजीनच, पण अनाथालयांतील १०८ लेंकरांना कापड पण धर्मार्थ दिल्यावांचून व्रताची सांगता झाली असं मानणार नाहीं बरं. म्हणजे जुनं व्रत पण झालं, नी नवंहि झालं. काय कमला ?

**कमला**— आभार आहेत हो मावशी तुमचे. तुम्हां वडील-धाऱ्या माणसांनीं आम्हांला अितका आशीर्वाद नी सहकार्य दिलं तरी पुरें आहे ! बरं लीला, शालिनी, मालिनी, तुम्ही साऱ्या जणींनीं कोणकोणचीं व्रतं या चातुर्मास्यांत धरलीं आहेत ?

**लीला**— आम्हीं दहा जणींनीं प्रत्येकीं लक्ष लक्ष वातींचं व्रत धरलं आहे. प्रत्यहीं शंभर-दोनशें वातींचा काकडा सकाळीं देव-घरांत वा देवळांत जाळायचा. अशीं लाखोली प्रत्येकीनं जाळली कीं दहा भट बोलावून त्यांना दहा सोन्याच्या वाती द्यायच्या. ( सगळ्या हंसतात ).

**कमळा**— भटांच्या घरीं सोन्याच्या वाती जाळतात होय ? लीले, पूर्वीं विजेचे, गॅसचे, रॉकेलचे दिवे नसत; तेव्हां घरीं, देवळीं पंथ्यांतून वातीच लावीत. तेव्हां त्या काळीं लाख वाती फुकट जात नसत. घरीं, देवळीं त्यांचा अुपयोग होअी. पण आतां जिकडे तिकडे रॉकेलचे कंदील, गॅस व विजेचे दिवे झगझगाटत आहेत. आतां त्या झगझगाटांत लाख वातींपायीं तुम्हां दहापांच जणींचं जें मणभर तरी तूप नुसतं जाळून टाकायचं त्यांत काय अर्थ आहे बरं ! पुन्हा वाती पेटवायच्या त्या म्हणे सकाळीं उजाडल्यावर पेटवायच्या. किती व्यर्थ मेहनत ! म्हणून म्हणतें, तुम्ही तें मणभर तूप असं

अगीच जाळून टाकण्यापेक्षां त्या अनाथालयांतील लेंकरांच्या तोंडीं घाला. नुसत्या कापसाच्या वाती पेटवून पडलेल्या अुजेडांत आपल्या राष्ट्रांतील दास्य, दारिद्र्य, दुष्काळ, दुर्दशा यांचा अंधेरच काय तो दिसतो ! पण आपल्या हिंदुराष्ट्राच्या त्या लेंकराच्या जीवनाची विझती वात जर तेववली ना तरच तो अंधेर घालविणारा खरा उजेड आपल्या घरीं पडेल !

**सकुताअी**– आणि प्राणदानाचं तेंच कृत्य देवालाहि जास्त आवडेल ! अग, माझ्या मुलीनं मुलालेंकरांच्या तोंडीं पडणारं तूप जर चुलींत अुगीच ओतून दिलं तर मी तिच्यावर रागावेन कां प्रसादेन ? तसंच देवाच्या लेंकरांच्या तोंडीं पडणारं हें मणोगणतीं तूप असं नुसतं जाळून टाकल्यानं देव उलट रागावतच असला पाहिजे. त्यापेक्षां तें मणमण तूप देवाच्याच नांवं त्या अनाथ लेंकरांस पोसण्यासाठीं खाअू घातलं तर त्यांतच खरा परोपकार घडेल! अिहलोकीं प्रत्यक्ष लाभ, परलोकीं पुण्य !

**शालिनी**– मीं कनी चातुर्मास्यांत केळीच्या पानावर जेवायचं व्रत धरलं आहे. चार महिने केळीच्या पानावर जेवायचं नी मग भटांना जेवायला घालून अेकेक चांदीचं केळीचं लहानमोठं पान दान द्यायचं.

**मालिनी**– मीं कनी भेंडीव्रत धरलं आहे. या चातुर्मास्यांत भेंड्यांची भाजी खायची नाहीं आणि शेवटीं भटाला बोलावून अेक चांदीची भेंडी दान द्यायची. आमच्या गोपाळ भटजींनीं सांगितलं आहे कीं, अिथं अशी चांदीची भेंडी दान दिली कीं मेल्यावर स्वर्गांत सोन्याच्या भेंड्या मिळतात हो जिवाला. ( सगळ्या जणी पुन्हा हंसतात ) हंसतां ग काय सारख्या ?

**रखमाबाअी**– अग, हंसूं नको तर काय करूं ! मला म्हातारीला देखील ही भटांची लुच्चेगिरी पसंत नाहीं बरं पडत ! कोण

ग हा गोपाळभटजी ? तो का ? वा ग वा ! लोकांचीं घरं मक्त्यानं बांधायचा त्याचा अेक धंदा आहेच. घरीं गायीम्हशी बाळगून दूध गांवभर विकतोच. अग परवां मीं मनुस्मृतींत अैकलं कीं, जो ब्राह्मण दूध विकतो तो तत्काळ पतित होतो म्हणून ! त्याचा मुलगा पोलिसखात्यांत मोठा कारकून आहेच. तीन मजली नवं घर त्यानं अलीकडेच बांधलं आहे. तिकडे तीं आपल्या हिंदूंचीं शेंकडों लेंकरं भुकेनं मरता आहेत, मिशनरी–मुसलमान त्यांना बाटवून हिंद राष्ट्राचे कट्टर शत्रु बनविता आहेत नी आम्ही अिकडे मणमण तूप आगींत जाळतों आहोंत नी अशा पैसेवाल्या धंदेवाअीक भटांना चांदीचीं केळीचीं पानं नी सोन्याच्या भेंड्या धर्म म्हणून दान देत आहोंत ! हा कसला मेला धर्म– अधर्म आहे हा ! कमल, तुझं म्हणणं अगदीं खरं आहे. हे भट मोठे लुच्चे आहेत. देवाच्या नांवं भावड्या लोकांना मनास येतील तशा थापा मारून स्वत:ची तुंबडी भरता आहेत !

**कमला**– पण रखमामावशी, मी म्हणतें, कीं ह्याचा सारा दोष भटांवरच टाकणंहि अन्यायाचं होअील. आजच्या भटांच्या बायाहि तींच व्रतं करून दुसऱ्यांना तशींच दानं देतात. भट तरी आपलेच भाअूबंद. त्यांनाहि सुधारावं तर तेहि सुधारतील ! खरा दोष आपल्या सगळ्यांच्या भाबडेपणाचा आहे. भट बळेंबळें लाठी घेअून कांहीं आपल्या घरीं येत नाहीं. आम्हींच त्यांस बोलावतों, भट आला नाहीं तर जेवत देखील नाहीं. मग आम्ही देअू तितकं दान तो नेतो ! तेव्हां मूळ दोष आपल्या भाबडेपणाचा ! आपण आपल्या विवेकानं पोथींत खोटं काय खरं काय तें ठरवावं. बरं सिताबाअी, तुम्ही कोणचं व्रत केलंत ?

**सीताबाअी**– मी काय बाअी व्रत धरणार ! घरीं मुलांना गोडधडदेखील मिळत नाहीं. मधुकरीदेखील मागावी लागते बिचाऱ्यांना म्हणून मी आपल्या वडाभोंवतीं लक्ष प्रदक्षिणा तेवढ्या गेल्या वर्षी

घातल्या. या चातुर्मास्यांत गोग्रास कानवल्याचं व्रत धरलं आहे. दर सोमवारीं नअू गुळाचे कानवले करतें, पैकीं आठ कानवले गायीला घालतें नी अेक तेवढा प्रसाद म्हणून मुलांना देतें. मी स्वत: अुपास करतें. असे सोळा सोमवार करायचे!

**सकुताअी—** अिश्श! हा तर निव्वळ आचरटपणा नाहीं का? अहो, घरीं मुलांना गोडधड मिळत नाहीं म्हणून अेकीकडे म्हणतां आणि गुळाचे नअू कानवले करून गायीसारख्या अेका पशूला आठ चारतां नी मुलांच्या तोंडीं अेक घालतां! अहो, मुलांमाणसांना दूध देते म्हणून जी गाय हवी, तिला, मुलांमाणसांना अुपाशी ठेवून तुपाशीं जेववायाचं काय? पशूची जोपासना करायची तर पशूसारखी करा. पशूला हिरवं गवत पेंढीभर आणून घाला, पाहिजे तर ओखट-वाणी घाला आणि कानवले मुलांना द्या! गोठ्यांतला पशु देव आहे, तर तुमचीं पोटचीं लेंकरं काय भुतं आहेत? माणसांहून पशु श्रेष्ठ आहे हें सांगणारं व्रत देवाचं नसून दैत्याचं आहे दैत्याचं!

**लीला—** तसंच तुझ्या त्या वडाच्या भोंवतीं लक्ष वेळां गरगर फिरायचं व्रत देखील भाबडपणाचं नाहीं का? त्यांत परोपकार असा ग कोणचा केलास?

**रखमाबाअी—** तुम्ही सगळ्याजणी कमलेच्या पट्टशिष्यिणी झाल्यातस दिसतं मला. खरंच बरं, तिचं जें म्हणणं कीं, अशींच व्रतं करावीं कीं ज्यांत या लोकीं प्रत्यक्ष परोपकाराचं कांहीं कृत्य, राष्ट्राची कांहीं सेवा घडेल, तें अगदीं बरोबर आहे हो. अमुक भाजी खायची नाहीं; केळीच्या पानावर जेवायचं, अुगीच लाख वेळां गरगर फिरायचं, असा व्यर्थ देहदंड करण्यापेक्षां देहदंडाचं तपहि घडावं आणि राष्ट्राची प्रत्यक्ष सेवा, या लोकीं कांहींतरी प्रत्यक्ष परोपकार करावा, असं मी अेक व्रत तुम्हांला सांगतें अं. तुम्ही निर्धन असल्यात तरी देखील पुष्कळ दान दिल्याचं पुण्य तुम्हांला कसं जोडतां येअील बघा अं. माझ्या अंगणास लागून

माझी ही केवढीतरी मोकळी जागा आहे. तींत नुसतं रान अुगवलं. तर तुम्ही दहावीस जणी प्रत्यहीं तिथं येऊन स्वहस्तानं खणून पेरून या चातुर्मास्यांत वांगीं, अळू, मिरच्या, कोथिंबीर प्रभृति शाकभाजी लावा. त्या अनाथालयास चारसहा महिने पुरेल अितक्या भाज्या आपण स्वतःच्या मेहनतीनं पुरवूं या !

**कमला–** ठीक ठीक ! दुर्वांचे भारे बांधीत भटकण्यापेक्षां वा वाती करीत वा हीं अशीं गाईच्या खुराचीं चित्रं काढीत वा झाडा-भोंवतीं लाख वेळां गरगर फेऱ्या घालीत राहण्यापेक्षां असा आपल्या धर्मबांधवांच्या, या हिंदुराष्ट्राच्या सेवेंत देह झिजवावा हेंच अुत्तम. जर देव झाडपशूंच्या सेवेनं संतोषत असेल, तर तो नराच्या सेवेनं अधिक संतोषत असला पाहिजे आणि त्या त्या व्रतांनीं पारलौकिक फळं मिळत असतील तींहि मिळत असलींच पाहिजेत ! आतां बघा अं, रखमाबाअी त्या अनाथ शंभर लेंकरांना कापड देतील, सकुताअी त्याचीं झबलीं नी सदरे शिवून देतील, तुम्ही मणभर तूप द्याल, ह्या सगळ्याजणी मिळून चार महिन्यांच्या भाज्या पुरवतील, म्हणजे आपण त्या अेका अनाथालयाचा केवढा खर्च भागवूं बरं ?– हिंदु धर्माची, राष्ट्राची, केवढी सेवा नी केवढा परोपकार करूं शकूं बरं ! मग घेतां ना हीं सगळीं व्रतं ?

**साऱ्या जणी–** अगदीं आम्हीं सगळ्यांनीं हींच व्रतें या चातुर्मास्यांत करायचा संकल्प हा आतांच केला बरं. तुम्ही जा नी त्या अनाथालयाच्या संचालकांना द्या हें वचन अितक्या धर्मार्थ सहाय्याचं.

**कमला–** त्यांना कितीतरी आनंद होईल. त्यांची केवढी चिंता दुरावेल हें अैकून ! जाऊं या आपण साऱ्या जणीच तिकडे. चला ! (जातात).



# ललनांच्या लावण्याचे हानिलाभ

पर्यायपीतस्य सुरैर्हिमांशोः ।
कलाक्षयः श्लाघ्यतरो हि वृद्धेः ॥
—कालिदास

युरोपच्या अेका नामांकित व्यक्तीनें लिहिलेला "Debits and Credits of Beauty" हा आमच्या महिलावाचकांच्या वाचनांत येण्याजोगा अेक लेख लाहोरच्या 'पंजाबी' दैनिकांत अलीकडेच प्रसिद्ध झाला आहे.

युरोपमध्यें सध्यां सौंदर्याची जिकडेतिकडे पूजा होत आहे. पण पूर्वीं अेकदां याच युरोपमध्यें रोमन क्याथोलिक पंथाचें वर्चस्व चालू असतां लावण्य हा ललनांच्या अंगचा, पुरुषांनीं ज्यापासून अत्यंत सावध राहावें असा अेक घातक दोष समजला जाअी. त्या

काळच्या युरोपीय धार्मिक वाङ्मयांत या घातक लावण्याची यथेच्छ निर्भर्त्सना केलेली आढळते. ख्रिश्चन धर्मांत जीजसच्या खालोखाल ज्यांचे शब्द धर्माज्ञेसमान पवित्र मानले जातात, त्या सेंट पॉल, सेंट पीटरप्रभृति आद्य महंतांच्या प्रत्यक्ष बायबलमध्येंच ग्रथिलेल्या अुपदेशांतून स्त्रीस्वातंत्र्याची, स्त्रीमोहाची आणि अेकंदर स्त्रीत्वाचीच कशी विटंबना केलेली आहे हें बायबलमधील खालील दोन अुताऱ्यांवरूनदेखील दिसून येईल—

"स्त्रियांनीं चर्चमध्यें मौन धारण केलें पाहिजे ! कारण तिथें बोलण्याची त्यांना आज्ञा नाहीं ! अज्ञान हाच त्यांचा मूळचा स्वभावधर्म. त्यांतहि जें शिकणें तें घरच्याघरीं आपल्या पतीकडूनच शिकलें पाहिजे. कारण चर्चमध्यें बोलणें स्त्रियांना लज्जास्पद आहे. (Corinthians XIV, 34)."

"पत्नींनो, आपल्या पतीलाच तुमच्या सर्वस्वाचा स्वामी माना ! ख्राअिस्ट जसा जगाचा प्रमुख धनि आहे, तसाच पति हाच पत्नीचा नेता आहे; स्वामी आहे....आदमनंतर अीव्ह उपजली. (पुरुष वडील; स्त्री मूळचीच धाकटी) त्यांतहि आदम ( पहिला पुरुष) हा न फसतां अीव्हच (पहिली स्त्रीच) पहिल्यानें फसली. अर्थात् स्त्रीच खरी अपराधिनी होय ! (Timothy II, 11-14)."

## स्त्रीला स्वतःच्या लावण्याची पहिली जाणीव आणि तिचें पहिलें पतन !

ख्रिस्ती आणि मुसलमानी धर्मपुस्तकांमध्यें मूळ यहुदी लोकांच्या धर्मग्रंथांत सांगितलेली जगदुत्पत्तीची कथाच अीश्वरोक्त सत्य म्हणून मानलेली आहे. थोडासा फेरफार असला तरी त्याच कथेंतील पुरुष नी स्त्री यांची प्रथम अुत्पत्ति कशी झाली तें वृत्तहि त्या तिन्ही धर्मग्रंथांतून असें सांगितलें आहे, कीं देवानें आदम हा पहिला

पुरुष निर्मिला आणि मग त्याची एक बरगडी काढून तिच्यावर मांस-मज्जा मढवून पहिली स्त्री 'ईव्ह' ही निर्मिली. त्याकारणें त्या तिन्ही धर्मांच्या अनुयायांच्या मतें स्त्री ही मूळचीच पुरुषाचें धन नी मत्ता असून पुरुष हाच तिचा स्वामी होय. यानंतरची माहिती त्यांच्यांतील कित्येक पंथांचीं पुराणें अशीं सांगतात, कीं ती पहिली स्त्री ईव्ह ही जरी अत्यंत सुंदर होती; तथापि तिला तिच्या निष्पाप स्थितींत तिच्या लावण्याची जाणीव नसे. तिचें रूप तिला स्वतःला कांहीं स्वतःच्या डोळयांनीं समग्र दिसत नसे. 'परांचिखानिव्यसृजत् स्वयंभू !' आपलें चक्षुरिंद्रिय दुसऱ्यांस पाहातें–स्वतःस नव्हे ! पण अेक दिवस काय झालें, कीं ईव्ह स्वर्गीय अुद्यानांत विहरत असतां अेका स्वच्छ सरोवराच्या कांठीं बसून त्यांत लीलया डोकावती झाली. पाहाते तों आंत अेक कधींहि न पाहिलेली अत्यंत मनोहर मूर्ति विलसत आहे ! त्या मूर्तीच्या लावण्यानें ईव्ह मोहित झाली. तेव्हां तिच्या ध्यानांत आलें, कीं ती मूर्ति ही तिचेंच प्रतिबिंब असून तीच मुळीं स्वरूपानें तशी नयनमनोहर आहे ! स्त्रीला स्वतःच्या लावण्याची हींच पहिली जाणीव आणि तिला तशी जाणीव करून देणारा स्वच्छ जलाशय हाच पहिला आरसा !

त्या पाण्याच्या आरशांत आपलें लावण्य असें मोहक आहे ही जाणीव त्या पहिल्या स्त्रीला जेव्हां पहिल्यानें झाली तेव्हां तिचा तिला अभिमान वाटूं लागला. लावण्याच्या जाणिवेसरशीं ती मानिनी झाली. अितक्यांत तो लबाड साप ! त्यानें तिची स्तुति करण्याची तीच संधि साधून ती त्या स्तुतीनें वाहवत चालली आहेसें पाहातांच तिला तें निषिद्ध ज्ञानफळ खावयाची भर दिली. 'देवानं तुला अज्ञानी ठेवण्याच्या कपटहेतूनंच ह्या ज्ञानवृक्षाचं फळ खाअूं नको म्हणून सांगितलं आहे. तेव्हां हे चतुरे, तूं तें अवश्य खा, कीं तुला-सुद्धां सगळं बरंवाअीट वळूं लागून तुम्ही माणसं देवच व्हाल !' पाणी हा जसा पहिला आरसा– तसाच साप हा स्त्रीचा पहिला पंतोजी !

'देवाच्या सांगण्यापेक्षां सापाची शिकवणच तिला पट्‌कन् पटते ! पाहिलेंत !' असें ही कथा सांगणारे ख्रिश्चन पुराणिक तिच्यावर आपलें भाष्यहि लगोलग करीत असत ! पुढें ओव्हच्या नादीं लागून आदमहि त्या कटांत शिरला आणि त्या दोघांनीं मिळून तें ज्ञानफळ गट्ट केलें ! त्यासरशीं ते दोघे पहिले स्त्रीपुरुषच नव्हत; तर यच्चावत् स्त्रीजात नी पुरुषजात वंशपरंपरा पतित झाली ! देवानें शाप देऊन त्यांना स्वर्गीय अुद्यानांतून हुसकलें. स्त्रीला सांगितलें, 'तुला शिक्षा हीच, कीं तुला गर्भदुःख, प्रसववेदना सळो का पळो करून सोडतील' आणि पुरुषास सांगितलें, कीं 'तुझं जीवन कष्टप्रद होईल !' ख्रिश्चन धर्मोपदेशक ह्या स्त्रीच्या आद्य अपराधावरून असें सिद्ध करतात, कीं 'पुरुषाच्या पतनाचें कारण स्त्री ! ती जगांतील पहिली अपराधिनी– पहिली पापी ! संभाळून असा अं तिला, तिच्या त्या लावण्याच्या मोहाला !'

पण स्त्रीच्या त्या लावण्याच्या मोहाला पहिला पुरुष जसा भाळला नी बळी पडला, तसें पुढें कोणी भाळूं नये म्हणून स्त्रीला नित्याची दासी करून ठेवण्याचा कितीहि कडक अुपदेश ख्रिश्चन धर्मानें जरी शतकोशतकें युरोपला केला, तरी शेवटीं स्त्रीनें त्याचा सूड अुगवावयाचा तो अुगवून त्या अेकांगी अुपदेशाची प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय, आजचा पुरुषी युरोप स्त्रीच्या लावण्याचाच दास करून सोडला आहे ! लावण्य हें लांछन होय, असा घोष चर्चाचर्चांमधून रोमन क्याथोलिक ख्रिश्चन धर्म ज्या युरोपमध्यें मध्ययुगांत अेकसारखा दुमदुमवीत राहिला होता, तोच युरोप आज ललनांच्या लावण्याचा निस्सीम अुपासक बनला आहे ! वैयक्तिक अपवाद वजा जातां वरील दोन्ही विधानें सामुदायिक अर्थीं वस्तुस्थितीस धरून आहेत. कित्येक सुंदर स्त्रियांच्या दातांचे, केंसांचे, वर्णांचे विमे कित्येक मुख्य प्रधानांच्या जीवनाच्या विम्यांहूनहि अधिक रकमेचे काढले जात आहेत ! कित्येक लावण्यवती नटींचा पगार कित्येक मुख्य बिशपांच्या पगाराहून अधिक असतो ! युरोप-अमेरिकेंतील

मोठमोठ्या राजधान्यांतून सौंदर्याची स्पर्धा होते आणि त्या स्पर्धेत जी रमणी सर्व स्पर्धालूंत अत्यंत लावण्याची ठरेल, तिच्या छाया-चित्रांच्या प्रति पोपच्या छायाचित्रांच्या प्रतींपेक्षां लाखालाखांनीं अधिक खपतात; प्रासादापासून पर्णकुटिकेपर्यंत भिंतीभिंतींवर सुरेख चौकटींतून विलसत असतात.

ललनांच्या लावण्याला लांछन समजण्याच्या धर्मवेड्या अति-रेकाच्या टोकापर्यंत पोंचलेला युरोपचा नीतिलंबक लावण्याचा दास होऊन पडणाऱ्या लंपटतेच्या उलट अतिरेकाला जाऊन पोंचला! अशा स्थितींत त्या दोन्ही अतिरेकांतील आंशिक सत्य डोळ्यांआड न करतां ललनांच्या लावण्याचें मूल्यमापन, ह्याचे हानिलाभ सम-तोलपणें जोखून ठरविण्याचा यत्न युरोपांतील अेका अनुभवी व्यक्तीनें केला, हें चांगलें झालें. ह्या दृष्टीनें आम्हीं आरंभीं अुल्लेखिलेला Ursula Blook ह्यांचा "Debits and Credits of Beauty" हा लेख आमच्या महिलावाचकांना त्यांच्या जिव्हा-ळ्याच्या अेका प्रश्नाची बरीच विचारार्ह छाननी करणारा वाटल्या-वांचून राहाणार नाहीं.

## Ursula Blook यांच्या लेखांतील महत्वाचा भाग

"ललनांच्या लावण्यापासून होणारे लाभ थोडक्यांत असे सांगतां येतील—

"चटकन् स्नेह जुळविण्यास सौंदर्य अुपयोगी पडतें. कारण, पाहाणारांचें मन सुंदरपणावर पाहातांक्षणींच लोलुपतें. साध्या स्त्रीची ओळख करून घेण्यापेक्षां सुंदर स्त्रीच्या ओळखीकडे लोकांच्या मनांचा ओढा अधिक; त्यांतहि पुरुषांचा विशेषच.

" तिच्याविषयीं पुरुषांना सहानुभूतिहि अधिक वाटते; तिचें मन मोडणें अधिक जड जातें. कारण तिच्या लावण्यानें त्यांच्या भावनांना मोह पडतो.

" मूळचेंच रूप सुंदर असलें म्हणजे स्त्रीला आपल्यापरीनें आपली अधिकांत अधिक छाप पाडण्यास अुत्तेजन मिळतें; सुलभ जातें. आपण शक्य तितकें आकर्षक व्हावें; निसर्गानें दिलेलें सौंदर्याचें अुदार आभूषण अधिकच खुलून दिसावें आणि त्याचा शक्यतो अुपयोग स्वत:ला करून घेतां यावा ह्यासाठीं रूपवती स्त्रियांचा प्रयत्न सारखा चालू असतो.

" लावण्यावर लुब्ध झालेल्या प्रियकरांची संख्या नेहमीं अधिकच असणार. त्यामुळें साधारण स्त्रियांना वरांची निवड करणें जसें जड जातें, तसें सुंदर स्त्रीला जाण्याचें कारण नसतें. माता नी पत्नी ह्या दोन्ही नात्यांचीं आपलीं कर्तव्यें पुरीं करण्यांतच स्त्रीजीवनाचें जें खरें साफल्य असतें, तेंहि रूपवती महिलेला सहजसाध्य होतें. रमणीय वधूला वर मिळणें सुलभतर असतें; अितकेंच नव्हे, तर अुलट वरामध्यें आपल्याला रुचेल तोच वर निवडण्याची संधीसुद्धां तिला केव्हांहि दुष्प्राप्य नसते. कारण वधूयाचना करणारे अनेक पुरुष तिच्या लावण्यानें तिच्याचकडे आकर्षिले जात असल्यामुळें तिचें स्वयंवरक्षेत्र अधिक विस्तृत नी विविध असतें. ज्यांना मागणी घालणारे अिच्छुक मुळांतच थोडे, त्या साध्यासीध्या स्त्रियांपेक्षां सुंदर स्त्रियांना आपल्या अनेक अिच्छुकांतून मनाजोगी निवड करण्यास कितीतरी वाव सांपडतो.

" या सर्व लाभांवरून ज्या स्त्रियांना सुंदर रूपाची देणगी मुळांतच लाभलेली आहे त्यांचें जीवन अधिक सुखमय नी अधिक सफल होत असावें असें कोणासहि सहजच वाटेल !

" पण मला त्याची शंका वाटते !

" कारण लावण्यापासून जरी हे अितके महत्वाचे लाभ होत असले तरी त्याच्यापासून होणारे तोटेंहि कांहीं थोडे नाहींत !

" पहिला तोटा असा, कीं सुंदर स्त्रीला पुष्कळ लोक जरी भाळतात, तरी ते नेहमीं चांगलेच असतात असें नाहीं. बहुधा वाअीट तेच तिच्याभोंवतीं जमा होतात. पुन्हा दुसरें असें, कीं अनेक चांगले-वाअीट लोक तिच्यापुढें धूप जाळीत राहिल्यानें तीहि अुगीच फुगून जाते; भानावर राहात नाहीं; ती छचोर होते; लहाडी बनते; गर्वानें बिघडते. विवेक न सोडतां संभाळून वागणें तिला फार कठीण जातें.

" आपल्याला काय कमी; हवे तितके लोक आपल्याला परिण्या-साठीं लोलुपलेले हवे तेथें सांपडतील, अशा घमेंडीपायीं ती ज्याला-त्याला झिडकारीत जातांजातां शेवटीं ' अति शाहाणा त्याचा बैल रिकामा,' अशी तिची फसगतहि होण्याचा संभव असतो. हें नको; तें नको, असें करतांकरतां शेवटीं हाताशीं कांहींच राहात नाहीं किंवा जें टाकाऊ तेंच स्वीकारणें भाग पडतें.

" याच कारणानें आणि अशाच चोखंदळ चुकीमुळें जगांतील कांहीं नामांकित लावण्यवतींना शेवटीं सुखाचा संसार थाटतां आला नाहीं, मनासारखें दांपत्यसुख मिळालें नाहीं. स्वतःची भरमसाट आकांक्षा नी स्वतःचें फुगीर मूल्यमापन या आपल्याच दोषांमुळें कित्येक सुंदरींचे विवाह श्रीमंतीचे झाले; पण सुखाचे झाले नाहींत !

" आज तर अशीच स्थिति आहे ! कारण आजकाल पुरुषांचा ओढा तारुण्याकडेच फार ! नुसती दिसायलाच नव्हे, तर वयानेंदेखील जी खरोखरीच तरुण आहे तिलाच आज जो तो अिच्छितो.

" त्यांतहि लोकांमध्यें अशी अेक घातक समजूत बळावलेली आहे, कीं कांति नी बुद्धि हीं जुळीं भावंडें नसतात. सुंदर मनुष्य बहुधा शाहाणें नसतें. ' देखनेमें ढबू और चलनेमें शिवराअी ' असाच प्रकार फार. ज्या व्यवसायांत बुद्धीलाच मागणी अधिक. त्यांत

अर्थातच सौंदर्य फिकें पडतें; त्याचा भाव अुतरतो. साधारण नोकरींतहि नुसत्या देखण्या स्त्रियांना त्यांच्या देखणेपणाचें फारसें सहाय्य न होतां अुलट कित्येकदां तो अेक अडथळाच होअून बसतो.

" रमणींच्यामागें तिच्याच स्त्रीजातीचा मत्सर सारखा हात धुऊन लागलेला असतो; हें तर फारच त्रासदायक असतें. विवाहित स्त्रिया अशा सुंदरींकडे नेहमींच शंकेखोर दृष्टीनें पाहातात. सुंदर मुलींविषयीं लोक जशा सहजासहजीं कंड्या पिकवतात, तसा त्रास साध्यासीध्या मुलींना कोणी फारसा देत नाहींत; पण सुंदर तरुणींवर ज्याचा त्याचा डोळा.

" सुंदर स्त्रीलाहि अितर लोकांची योग्य परीक्षा करणारा विवेक फारसा राहात नाहीं. बहुधा तिच्या स्वत:पेक्षां तिच्या लावण्या-वरच लोकांची दृष्टि खिळलेली असते. तिच्यापेक्षां तिचें सुंदर मुख त्यांना आवडलेलें असतें. तिचे खरे स्नेही कोण, कोणाचें प्रेम प्रामा-णिक, तें ओळखणें कठीण जाअून माणसाची परीक्षा करण्यांत तिची अनेकदां फसगत होते. केवळ मी चांगली दिसतें म्हणून काय तें हे माझ्याशीं लाडीगोडी लावतात असें ज्यांच्याविषयीं तिला वाटतें, तेच मात्र क्वचित् तिच्यावर खरेंखरें प्रेम करणारे असतात आणि ज्यांना ती खरेखरे मित्र म्हणून शपथपूर्वक मानते, तेच अंतीं अप्रामाणिक ठरतात. वारंवार अशा फसगतीनें शेवटीं ती सर्वांनाच संशयास्पद मानूं लागते; तिला कोणीच खरा वाटेनासा होतो.

" त्यांतहि सौंदर्याला सारखी झीज लागलेली असते ! ती भरून काढण्यासाठीं सारखी खटपट करावी लागते. रमणीला ती आपली पदवी राखण्यासाठीं आपल्यापरीनें शक्य तितकें सर्वांगसुंदर दिसा-वेंच लागणार ! लोक कुजबुजूं लागले कीं काय कीं, ' ही अुतरलेली दिसते नाहीं का ? ' अशी तिला सारखी शंका येत राहाते. आपल्या लावण्याची ख्याति फिकी पडूं नये यासाठीं प्रयत्न करतांना सुंदर स्त्रीला पराकाष्ठेचा ताण सोसावा लागतो.

'आणि सौंदर्याचें सर्वांत असह्य व्यंग म्हणजे वार्धक्य !

" जिचें रूप मनोहर; जिच्या पायांशीं तिच्या त्या लावण्यानें मोहित होअून सारें जग लंपटलेलें आहे अशी रमणी अशा अेका अुंच पदावर चढलेली असते, कीं त्यावरून अुतरणें अगदीं दुर्घटच व्हावें. प्रभुत्वाची रुचि चाखलेली असावी, प्रभुत्व गाजविलेलें असावें आणि नंतर तें प्रभुत्व आपल्या हातून दिवसानुदिवस निसटून जाअू लागावें, हें कोणासहि असह्यच वाटणार ! जो मोहक हावभाव नी खेळकर हंसणें-रुसणें सुंदरीच्या तारुण्यांत अितकें आक-



स्त्रीला स्वतःच्या लावण्याची हीच पहिली जाणीव आणि तो जलाशय हाच पहिला आरसा.

र्षक भासे, तेंच त्या स्त्रीच्या वयोमानानें पुढें अेकाअेकीं पाचकळ नी तिरस्कारार्ह ठरूं लागलेलें पाहून त्या सौंदर्य सुकत जाणाऱ्या वार्धक्योन्मुख स्त्रीच्या मनास धक्का बसल्यावांचून कसा राहील ? **लावण्यवती स्त्रीचें खरें कौशल्य वृद्धपणीं वार्धक्याला शोभून जाण्यांतच आहे !**

" सुंदर ललनांच्या या दुर्गतीची कींव करण्याचें सोडून लोक अुलट तो चेष्टेचाच विषय समजतात. वृद्धपणीं सगळे जवळजवळ सारखेच दिसतात. अुभ्या आयुष्याच्या संवयी बदलणें आणि ज्या वार्धक्यांत, प्रभुत्व गाजविण्याचें साधन जें लावण्य त्यालाच अंतरावें लागतें त्या म्हातारपणांत दिवस काढणें हें कोणत्याहि स्त्रीला दुःसह आणि दुर्घटच असणार.

" लावण्याचे हे हानिलाभ मोजून जमेची नी व्ययाची वजावाट करतां लाभापेक्षां हानीच अधिक भरल्यामुळें आणि म्हणूनच आय-व्ययाची तोंडमिळवणी करणेंदेखील अशक्य झाल्यामुळें मला असेंच सांगणें भाग आहे, कीं अेकंदरींत लावण्य हें ललनांस सुखप्रद होत नाहीं; सौंदर्याच्या पदरीं शेवटीं निराशेचा फोल हुंगामच बहुधा पडतो.

" सौंदर्याच्या ठेवीवर आधीं म्हणण्यासारखें व्याजच मिळत नाहीं. जें मिळतें त्यावर भारी कर द्यावा लागतो; ज्या पेढीवर ती ठेव ठेवलेली असते, ती पेढीच मुळीं केव्हां बुडेल याचाहि नेम नसतो. अगदीं बिनधोक नी सुरक्षित अशा कोणत्याहि रोख्यांत हें सौंदर्यधन गुंतवितां येत नाहीं ! साधें रूप तेंच अेकंदरींत स्त्रीला सौंदर्यापेक्षां अधिक हिताचें नी कमी धोक्याचें आहे ! "

## लावण्य हें जितकें लोभनीय तितकेंच हितकारकहि आहे !

वर अुतारलेल्या Ursulr Blook यांच्या लेखांत लावण्यापासून होणारे हानिलाभ हे पुष्कळ विचारपूर्वक नी समतोलपणें सांग-

ण्याचा यत्न केलेला आहे खरा; परंतु त्या विचारांची मांडणीहि सुसंगत नाहीं आणि त्या हानिलाभांची तुलना करून काढलेलें तात्पर्य तर अगदींच अेकांगी आहे. आयव्ययांतील रकमा टिपतांनाच मुळीं भलत्याच्या नांवें भलत्याच्याच रकमा पडल्या ! कारण सौंदर्यापासून होणारे म्हणून जे तोटे दिले आहेत ते वस्तुतः सौंदर्यापासून होत नसून त्याच्या दुरुपयोगानें किंवा सदुपयोग न केल्यानें जे होतात ते आहेत.

सौंदर्यापासून होणारे जे तोटे वर दिलेले आहेत, त्यांपैकीं अनेक 'दृष्टीपासूनहि होतात' असें दाखवितां येअील. चांगलें दिसतें म्हणूनच अनेक प्रसंगीं पाहूं नये तें अुद्वेजक पाहावें लागतें. आपल्या प्रियकराला अपघातांत रक्तबंबाळ झालेलें पाहून किंवा कुपुत्राला दारूपायीं दारोदार भीक मागतांना पाहून किंवा पेशवाअीच्या शेवटच्या दिवशीं त्या मानधन श्रीमंतांच्या शनवारच्या वाड्यावरील हिंदुपदपादशाहीचा जरिपटका खालीं पाडून त्यावर अिंग्रजांचा जॅक सरसर वर चढतांना पाहून—दुखावलेलें मनुष्यमात्र वैतागानें असेंच म्हणून जातें, कीं 'अरेरे ! ही दुर्दशा पाहावी लागण्यापेक्षां देवानें डोळेच दिले नसते तर किती बरं झालं असतं !' तशा वैतागानें 'लावण्यच' नसतें तर माझी अशी दुर्दशा कां होती असें अेकादी हेलन किंवा क्लिओपात्रा किंवा पद्मिनी दुःखावेशांत अुद्गारली, तरी त्यामुळें लावण्य स्वयमेवच टाकाऊ ठरत नाहीं. घातकहि ठरत नाहीं. दृष्टीनें कधींकधीं दुर्दशा पाहावी लागते. म्हणून दृष्टि हीच घातक आणि अेकंदरीत दोन्ही डोळ्यांनीं आंधळें असणें किंवा निदान अंधुक दिसणें हेंच चांगलें असें का म्हणावयाचें ?

लावण्य वयोमानानें झिजतें तशी दृष्टीहि मंदावते; बुद्धीहि झिजते. लावण्यवतींची म्हातारपणीं केंविलवाणी स्थिति होते; तशी बुद्धिवानांची आणि डोळसांचीहि होते. वृद्धपणीं डोळे आंधळे नी बुद्धि निकम्मी होत चालली असतांहि मनुष्यास असह्य खेद वाटतो.

लावण्याच्या पायीं अनेक अुन्माद घडतात; तसेच अुन्मार्गगामी बुद्धी-कडून घडतात, दृष्टीकडूनहि घडतात. म्हणून निर्बुद्ध मनुष्य किंवा जन्मांध मनुष्यच खरा सुखी असें कांहीं त्याचें तात्पर्य काढतां येणार नाहीं !

मनुष्याला आपल्या बुद्धीच्या बळानें आजवर अनेक सोयिस्कर शोध लावतां आले; जे मनुष्याला जन्मतः मिळालेले नाहींत असे अनेक लाभ संपादितां आले. मोटारी-आगगाड्यांच्या साधनांहीं त्यानें आपली गति शतपटीनें वाढविली; नावा, आगनावा काढून समुद्र अुल्लंघिले; विमानांहीं पंखांची अुणीव भरून काढली; अनेक रोगांचा औषधांहीं नी शल्यांहीं त्यानें पाडाव केला; पण अजूनहि जन्मानें जें मिळालें नाहीं तें लावण्य संपादिण्याअितकी, आपलें मूळचें साधें वा ओंगळ रूप बदलून तें सुंदर नी सुरेख करण्याची युक्ति शोधण्याअितकी त्याच्या विज्ञानाची प्रगति झालेली नाहीं; सन्निधच्या भविष्यकाळांतहि कुरूपाला सुस्वरूप करण्याची तर दूरच, पण काळ्यांना गोरे करण्याची युक्तीसुद्धां मनुष्याला सांपडेलच अशी हमी आज देतां येत नाहीं. मनुष्याला अशा प्रकारें यत्नानें जें संपादतां येत नाहीं; पण जें अत्यंत लोभनीय वाटतें; तें दुःसाध्य स्वरूपसौंदर्य ज्याला जन्मतःच लाभलेलें आहे त्या पुरुषानें वा स्त्रीनें ती अेक दैवाची स्पृहणीय देणगीच मिळाली आहे असें समजणें आणि त्या मानानें त्या त्या प्रकरणीं स्वतःस भाग्यशाली मानणें हें अगदीं साहजिक नी अुचित आहे. ज्या राष्ट्रांतील पुरुष '**दीर्घोरस्को वृषस्कंधः शालप्रांशुर्महाभुजः**' अशा पौरुषी सौंदर्यानें आणि स्त्री, जिला पाहातांच विरक्त तपस्व्यांनींहि **त्वमस्य विश्वस्य च नेत्रकौमुदी !** असें संबोधावें; अशा लोभनीय लावण्यानें विलसत आहे; त्या राष्ट्रानें त्या आपल्या रूपसंपदेस अेकाद्या स्वर्गीय वरदाना-सारखें जपलें पाहिजे; सृष्टीच्या त्या विशेष अुपकृतीस्तव तिचें आभारीच असलें पाहिजे.

त्यांतहि ललनेचें लावण्य ह्या तर सृष्टीच्या कलाकुसरीचा अत्यंत कमनीय असा कांचनी कळसच आहे ! चित्रलेखा अेकाहून अेक सुंदर पुरुषांचीं चित्रें रेखीतरेखीत जेव्हां प्रद्युम्नाचें चित्र रेखिती झाली, तेव्हां अुषा जशी अत्युत्कट समाधानानें अुठून वदली, ' थांब सखे, ठेव खालीं ती कुंचली ! माझ्या स्वप्नांतली मनोहर आकृति ती हीच !' तसेंच अेकाहून अेक सुंदर आकृति कल्पीत,



साध्या स्त्रीपेक्षां सुंदर स्त्रीकडे लोकांच्या मनाचा ओढा अधिक असतो.

चितारीत ती मनाजोगी न झाल्यानें भूगर्भीय ( Geological ) रद्दीच्या टोपलींत टाकीत सृष्टिदेवी आपल्या कलागृहांत (Studio) युगोयुगें चितारीत बसली असतां जेव्हां तिच्या कुशल कुंचलींतून अंतीं लावण्यवती ललनेचें चित्र अुतरलें, तेव्हां ती सृष्टि, ती आद्य नी अमर चित्रलेखा, ती आपलीच अपूर्व कलाकृति पाहून आपणच विस्मय पावली नी आपल्याशींच कलानंदनांत तन्मय होअून म्हणाली, ' अहाहा ! हीच ती माझ्या सौंदर्याच्या स्वप्नांतील मनोहर कलाकृति ! माझं आदर्श चित्र !' कवितादेखील ललनेच्या त्या मनोज्ञ लावण्याला पाहून अुद्गारली, ' वा रे वा !–'

अस्याःसर्गविधौ प्रजापतिरभूच्चंद्रो नु कांतिप्रदः
शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः ॥
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतुहलो
निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ॥

कोमल कविता तर काय !– पण तो महादेव, तो विरूपाक्ष अुग्र ! तोदेखील त्या रमणीय ललनेला पाहून क्षणैक विचलित झाला ! ' **चंद्रोदयारंभ अिवाम्बुराशिः** ' आणि ' कुमारसंभवांत वर्णिल्याप्रमाणें ' **अमामुखे बिंबफलाधरोष्ठे । व्यापारयामास विलोचनानि ॥** '

आजहि सृष्टीच्या कलागृहांत लावण्यवती ललनेच्या त्या सुंदर चित्रापेक्षां अधिक लोभनीय अशी दुसरी कलाकृति आढळत नाहीं. ललनेच्या लावण्याहून सरस असें दुसरें सौंदर्यस्वप्न सृष्टीलाहि अजून पडलेलें नाहीं; तिच्या कल्पनेला सुचलेलें आजतरी दिसत नाहीं ! अुद्यांचें कोणीं सांगावें ?

असें हें ललनेचें लावण्य जर नामशेष झालें तर जीवनाला अेका अत्यंत विमोहक आनंदास मुकावें लागेल; नव्हे, जीवनाची अेक प्रेरणाच पंगु होअील.

कारण, ललनालावण्य ही जीवनाची अेक नयनानंदक अशी शोभाच काय ती नसून तें सृष्टीच्या प्रजननलालसेचें वशीकरणचूर्ण आहे. लावण्य हें भगवान् मदनदेवाच्या हातांतील अमोघ अस्त्र आहे ! याच अस्त्राच्या बळावर 'कुमारसंभवाचें' लोकहित-कारक देवकार्य साधण्यासाठीं सिद्ध झालेल्या परंतु त्याचें वज्रहि तें देवकार्य साधण्यास अक्षम झालेलें पाहून चिंतातुर असलेल्या अिंद्रास मदन सावेश आश्वासूं शकला, कीं '**प्रसीद विश्राम्यतु वीर वज्रं ॥ शरैर्मदीयैर्कतमः सुरारिः । बिभेतु मोघीकृत-बाहुवीर्यः ॥ स्त्रीभ्योपिकोपस्फुरिताधराभ्यः ॥**'

## लावण्य ही प्रभवाची अेक प्रेरणा आहे !

ज्या हेतूसाठीं प्रथमप्रसव मातेला सृष्टीनें पुढें दूध दिलें, मुख्यतः त्याच हेतूसाठीं तिनें कामिनीकुमारीला आधीं लावण्य दिलें. प्रजाजनन हाच नव्हे तर सुजनन ( Eugenics ) हाच, ललनेला ही विलोभनीय लावण्याची दैवी देणगी देण्यांत निसर्गाचा मुख्य अुद्देश आहे; हीच निसर्गाची अपेक्षा आहे.

तेव्हां लावण्यवती कुमारींनो, जननींनो, तुम्हांस जन्मतःच निसर्गानें दिलेल्या ह्या दैवी देणगीस आपल्या पूर्वपुण्याअीचें वरदानच माना आणि त्यास अत्यंत जपा ! **लावण्यच नव्हे, तर प्रत्येक स्त्रीनें तिला जें रूप जन्मतः लाभलेलें असेल तें त्यांतल्या त्यांत खुलून दिसावें असा यत्न अवश्य करावा**, प्रसाधनांहीं आपली कांति, वर्ण, शोभा वाढवावी. स्त्रीचें सौंदर्य ज्यायोगें विकासेल तिला त्याचा योग्य तो लोभ लागेल असें अुत्तेजन तिला मिळालें पाहिजे.

आपल्या आर्य राष्ट्रांत पूर्वी स्त्रियांच्या लावण्याचा गौरव होत असे. लावण्य हें लांछन नसून ललनांचें अेक स्पृहणीय विभू-षणच कसें मानलें जाअी त्याचेहि पुरावे आपल्या संस्कृत वाङमयांत

आढळून कां येतात ? रामायण महाभारतासारख्या आर्य ग्रंथांतहि स्त्रियांना लावलेलीं संबोधनें पाहा ! ब्रम्हर्षि नी राजर्षीसुद्धां त्यांना 'हे सुकेशि, हे सुलोचने, हे सुमुखि, हे रंभोरु' असें संबोधतांना आढळतात. स्त्रीवाचक शद्व नी विशेषणें पाहा – रमणी, ललना, रामा, सुंदरी, वरोरु, सुमध्यमा, पृथुजघना, कामिनी, कांता ! स्त्रियांच्या प्रत्येक अवयवाचें नी अेकंदर देहलतेचें सुगठण नी सौंदर्य हें असें अेक गौरवार्ह आभूषण समजलें जात असल्यानें स्त्रियांकरवीं तें जन्मजात सौंदर्य शक्यतों जपून, कांतिवर्धक चूर्णादिक प्रसाधनांहीं जोपासून आणि आपल्याला मिळालेली ती पैतृक देणगी होती त्याहून वाढवून आपल्या संतानाच्या हातीं सोंपविली जाअी. स्त्रियांना आपल्या लावण्याचा असा सदुपयोग करण्यास समाजाकडून अुत्तेजन मिळत गेल्यानें पिढीपिढीचें सौंदर्य वाढत जाअी. आअीहून मुलगी सुंदर, पित्याहून पुत्र अधिक सबळ असें ज्या राष्ट्रास आपलें शरीरसौष्ठव प्रतिपिढीस वाढत जावें असें वाटतें, त्यांची संस्कृतीहि कलासुंदर बनते.

जी जितकी गबाळ नी जितकी कुरूप– ती तितकी सुवृत्त नी सुशील असें मानणारी कलाहीन संस्कृति ही संस्कृति नसून विकृति आहे. पिढीपिढी अशा अरसिक अुपेक्षेनें अधिकाधिक ओंगळ बेडौल नी भेसूर होत जाते !

## परंतु—

लावण्यवतींनो, तुम्हीं हें मात्र विसरतां कामा नये, कीं लावण्य ही तुमच्या हातीं सोंपविलेली निसर्गाची दैवी ठेव आहे. म्हणूनच त्या अनर्घ्य निक्षेपाची (Trust ची) नैसर्गिक अटहि तुम्हीं पाळली पाहिजे. ती अट म्हणजे सुजनन, सुप्रजनन ! जी लावण्यलतिका निःसंतान, ती निष्फळ आम्रलतिकासमान व्यर्थ आहे; निकम्मी आहे. जीवन हाच अेक यज्ञ आहे; सद्‌गुण वा दुर्गुण ठरविण्याची मानवी कसोटी अेकच, कीं मनुष्यजातीच्या सामुदायिक हितार्थ त्या यज्ञास

जो उपकारक तो सद्गुण; अपकारक तो दुर्गुण ! जर तुमचें लावण्य तुमचें लांछन न ठरवितां, दुर्गुण न ठरवितां तुमचा अेक अत्यंत सौभाग्यास्पद सद्गुण ठरविणें असेल, तर त्या लावण्याचा असा सदुपयोग करा, कीं त्यायोगें तुमच्या राष्ट्राचें कल्याणच व्हावें. तुमचें सुख नी हितहि त्यांतच सामावलेलें आहे, असलें पाहिजे. जर अेकाद्या आम्रवल्लरीला नुसता मोहोरच मोहोर फुलेल; पण फळ धरणार नाहीं; तर तिला कोण विचारतो ? अमृतोपम मधुर आम्र-फळांहीं लवलेली आम्रवल्लरीच खरी स्पृहणीय ! तसेंच जी स्त्री स्वतःचें लावण्य झिजूं नये म्हणून नुसती नट्टाफट्टाच करीत मिरवीत राहाते आणि सुरेख संतान प्रसवण्याचें नी जोपासण्याचें आपलें जीवन-कर्तव्य तशा राक्षसी हांवेनें टाळते; ती स्वतःतर वात्सल्याच्या अेका अत्यंत मधुर आनंदास आंचवतेच; पण राष्ट्रावरील ही अेक आपत्ति होअून बसते ! ज्या हेतूनें निसर्गानें तें लावण्य तिला दिलें तो हेतु, ती अट, न पुरविल्यानें आणि तें निसर्गधन संततिहितार्थ न नियोजिल्यानें ती नैतिक चौर्याची अपराधिनी ठरते.

" भुञ्जते ते त्वघं पापाः ये पचंत्यात्मकारणात् । ' संतति-नियमन तें, कीं जें उत्तम संतति प्रसवण्यासाठींच काय तें आचरलें जातें. संततिनियमन म्हणजे संतत्युच्छेदन नव्हे ! तो आत्मघात तर आहेच आहे; पण राष्ट्रघातहि आहे ! आपलपोटेपणाची ती राक्षसी परिसीमा होय !

## संतत्युच्छेदन हें लावण्याची जोपासना नसून लावण्यहत्त्याच होय !

ही कांहीं अलंकारिक अतिशयोक्ति नाहीं; तर अेक सामाजिक सत्य आहे. वर दिलेल्या Ursula Blook यांच्या लेखांत लाव-ण्याचें सर्वांत दुःखप्रद व्यंग म्हणून जें सांगितलें आहे, तें म्हणजे

त्याची भंगुरता हेंच होय. लावण्य हें फूल आहे आणि फुलाप्रमाणेंच देखतदेखत फुलतें न फुलतें तोंच सुकतें. 'गलितयौवना कामिनी' हें अेका भर्तृहरीच्याच नव्हे, तर मनुष्यजातीच्याच हृदयांत सलणारें शल्य आहे ! ललनांनो, आपलें लावण्य ओसरूं नये म्हणूनच जर आपल्या सुप्रजननाच्या अत्युदार सामाजिक कर्तव्यालाहि चुकण्याची अधम अिच्छा आणि वात्सल्याच्या अत्यंत मधुर सुखास मुकण्याची चुकी होत असेल तर ध्यानांत धरा, कीं तें लावण्य तुम्हीं काय वाटेल तें केलेंत तरी गळत्या घागरींतील पाण्यासारखें भरतां भरतां ओहोटीस लागणारच लागणार; तें झिजणारच झिजणार ! सांचवूं म्हटलें तरी तें आटणार; टिकवूं म्हटलें तरी तें नासणार. सोळापासून सव्वीस वर्षांपर्यंत फुलणारें हें पावसाळी फूल ! फारफार तर दहा वर्षांची ही सौंदर्याची शिदोरी ! तुमचीं चाळीस वर्षें म्हणजेच बहुतेक जीवन लावण्याच्या अुपासमारींतच तुम्हांस काढावें लागणार ! अशा ह्या लोभनीय पण अत्यंत क्षणिक नी नश्वर अशा सौंदर्याच्या नादीं लागून साऱ्या जीवनाच्या कल्याणास नी कर्तव्यास मुकण्याची नी हुकण्याची चुकी कोणती विवेकी वनिता करील ?

आणि तरीहि अेका अर्थीं व्यक्तीचें नसलें तरी समाजाचें लावण्य अमर करण्याची अेक युक्ति निसर्गानें मनुष्याच्या हातींच ठेवलेली आहे. लावण्य झिजेल म्हणून ज्या सुप्रजननाची वेडसर वनितांना भीति वाटते त्या प्रसवानेंच लावण्याची झीज भरून निघते.

## व्यक्तीचें नसलें तरी राष्ट्राचें लावण्य अमर करण्याची युक्ति !

अेकाद्याला गुलाबाची बागची बाग सदा टवटवलेली, सदा बहरलेली हवी असेल तर माळी काय करतो ? दहापांच गुलाब अेकदां लावून काय तो स्वस्थ बसत नाहीं. ते गुलाब हळुहळु झिजणारच;

निःसत्व होणारच. यासाठीं ते जोंवर बहरलेले आहेत, तोंवर त्यांचीं कलमें करून माळी सर्वत्र नवेनवे गुलाब लावतो. त्यायोगें अेक गुलाब निःसार होतो तों त्याच्याच जीवनाचे पागोरे असलेल्या अकरा गुलाबांना नवनवा बहार येतो. ती गुलाबाची बाग अशी सदा बहरलेली असूं शकते. तसेंच ललनांनो, तुमच्या लावण्याचें आहे! तें जोंवर खुललेलें आहे, तोंवर त्या लावण्यलतेचीं कलमें नवजीवनाच्या भूमींत लावीत चला. ज्या अेका सुंदर मातेच्या सभोंवतीं तिच्या चार सुंदर कन्यका, शोभिवंत सुतसुतांचा मेळावा विलसत, विहरत रमलेला आहे— तिचें लावण्य सफल झालें; जीवन पुन्हा ताजें झालें. तिच्या स्वतःच्या यौवनाचा बहर ओसरतो न ओसरतो तोंच तिच्या लावण्यानंदाची झीज शतपटीनें भरून काढणारा वात्सल्यानंद तिच्या हृदयांत उचंबळूं लागतो. तिच्या जीवनाचा पूर्वार्ध जसा लावण्यानें तसाच अुत्तरार्ध वात्सल्यानें रसरसलेलाच राहिल्यानें तिचें आयुष्य केव्हांच नीरस होत नाहीं. तिचें लावण्य नी तारुण्य तिच्या कन्या-पुत्रांत पुन्हा वाढीस लागतें; तिच्या राष्ट्राचें लावण्य नी तारुण्य अमर होतें!

## लावण्य विलोभनीय आहेच; पण लावण्याहूनहि शील अत्यंत विलोभनीय होय!

यास्तव लावण्याची जोपासना तर कराच; पण महिलांनो, ज्यायोगें मनुष्यजातीच्या कल्याणार्थंच त्याचा विनियोग होओील अशाच प्रमाणांत नी प्रकारानें सौंदर्यास महत्व द्या; त्यास सत्कारणीं लावा. हेंच शील! हें शील जन्मभर पुरणारी नी मृत्यूनंतरहि पुरून अुरणारी संपदा आहे. जिला रूप नाहीं; पण हें परोपकारी वत्सल नी विवेकी शील आहे ती स्त्री जिला नुसतें रूप आहे पण हें वात्सल नी प्रामाणिक शील नाहीं तिच्यापेक्षां अधिक गौरवार्ह समजली पाहिजे. ती अेकंदरींत अधिक सुखी नी समाजाला शेवटपर्यंत

अधिक हवीशी असते. पण जिला लावण्य नी शील हीं दोन्ही आभूषणें लाभलेलीं आहेत, तिला लावण्यापासून होणारे लाभ तर मिळतातच; पण Ursula ह्यांच्या वरील लेखांत सांगितलेले तोटेहि त्याच्या सदुपयोगानें बव्हंशीं टाळतां येतात. आपलपोट्या वांझेचें लावण्यहि झिजतेंच; पण अेकाद्या कंजूषाचें धन नाहींसें होतांच त्याला जशा असह्य वेदना होतात, तशी तिची त्या लावण्यास वयानें हरल्या-नंतर दुर्गति होते. आपल्या बीजांना नवजीवनाच्या क्षेत्रांत पेरून जी सुंदर संततीचें अुद्यानचें अुद्यान अुगवते नी जगताची शोभा नी संपदा वाढविते त्या शीलवती मातेचेंहि लावण्य झिजतेंच ! – पण जसा तो दानशील आर्यसम्राट् सर्वदक्षिण यज्ञांत आपली सारी मत्ता प्रजाजनांत वांटून देअून '**मृत्पात्रशेषामकरोद्विभूतिम्** ' तसें त्या मातेचें लावण्य नाहींसें झाल्यानेंच ती लावण्य होतें तेव्हांपेक्षांहि अधिकच मनोज्ञ भासूं लागते ! तिचें लावण्यदारिद्र्यच तिला तिच्या लावण्यसंपदेहूनहि शोभूं लागतें. '**आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव !**'

आपल्या पुराणांतील अनेक सुरेख कथांत अशी अेक कथा आहे, कीं पौर्णिमेच्या पूर्णचंद्राला अमृताच्या कांठोकांठ भरलेल्या पेल्या प्रमाणें देव पिअूं लागतात. त्या सुधाकराच्या कला पितांपितां शेवटीं देव अेक कला तेवढी त्याला अुरूं देतात. तीच प्रतिपदेची चंद्र-कोर ! पण म्हणूनच पुनवेच्या प्रफुल्ल चंद्राला जो मान नाहीं तो देवकार्यीं आपलें सर्वस्व वाहून क्षीण झालेल्या त्या प्रतिपदेच्या चंद्र-कोरीला आहे– लोक तिला पूजितात; पूर्णचंद्राला नव्हे !

जिच्या कौमार्यांत लावण्याचा नेत्रानंददायी चंद्र आरोग्याच्या सकल कलांहीं प्रफुल्ल झालेला आहे; सच्छील यौवनांत जिच्या

अुदरीं देवदूतांसारखीं सुंदर नी सुलक्षणी बालकें जन्मलीं आहेत, आणि त्यांना आपल्या त्या लावण्याचें नी शीलाचें तें वत्सल दूध पाजून संवर्धितांना जी स्वतः प्रतिपदेच्या चंद्रकोरीसारखी क्षीण कलाहींच पूर्ण कलांपेक्षांहि प्रौढावस्थेंत सुभग भासत आहे; त्या जननीला आमचें शतवार वंदन असो ! !

तिच्या यौवनाचा नी लावण्याचा तो–

पर्यायपीतस्य सुरैः हिमांशोः
कलाक्षयः श्लाघ्यतरोहि वृद्धेः ॥



# व्रतविधि आणि विवेक

## [ पूर्वार्ध ]

आपणां हिंदूंतच नव्हत तर धर्मभोळेपणाच्या आहारीं गेलेल्या मुसलमान-बुद्ध-ख्रिस्तीप्रभृति साऱ्या 'पोथीनिष्ठ' 'किताबी' समाजांमध्यें व्रतवैकल्यविधींचें थोतांड अितकें माजलेलें आहे, कीं त्यामुळें त्या त्या समाजांत विज्ञानाचा फैलाव होण्यास मोठा अडथळा येतो ज्ञानाची प्रगति खुंटते. पंगूची बुद्धि पंगु राहाते. युरोपियन राष्ट्रें तेवढीं त्या धर्मभोळेपणापासून आज पुष्कळ अंशानें मुक्त झालीं आहेत, विज्ञाननिष्ठ बनलीं आहेत. अशीं विज्ञाननिष्ठ प्रगतिपर व्रतें कोणचीं नी अज्ञाननिष्ठ कोणचीं ही चर्चा, विशेषतः आपणां हिंदूपुरती या लेखांत करूं.

व्रतविधींचा हेतु धार्मिक दृष्टीनेंहि दोन प्रकारचा असतो. अेक देवाची आराधना आणि दुसरा काम्यफलाची प्राप्ति. ही काम्यफलाची प्राप्ति वैयक्तिक नी सांधिक अशी अुभयविध असते.

या दोन अुद्देशांपैकीं देवाची आराधना ही देवाच्या अनेक प्रतीकांचीं--अश्वत्थ, गोमाता, गौरीगणपति, तुळस, म्हसोबा, बहिरोबाप्रभृति नाना रूपांची जरी असली, तरी देव अेकच असल्यानें आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरं । सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ।। या शास्त्रोक्त न्यायानेंहि त्या भगवानासच पावते आणि तोच संतुष्ट होअून तीं तीं काम्यफलें आपणांस त्या व्रत-वैकल्यांचा परिणाम म्हणून देतो. तेव्हां व्रतवैकल्यें वरवर जरी नाना देवताप्रीत्यर्थ केलेलीं असलीं तरी तत्त्वतः तीं अेकाच भगवानाच्या संतोषार्थ केलेलीं असतात. सर्व यज्ञतपोदानांचा भोक्ता नी सर्व काम्याकाम्य फलांचा दाता तीं तीं प्रतीकें नसून ज्याचीं तीं प्रतीकें आहेत तो भगवानच होय, हें तत्त्व श्रीभवत्गीतेसारख्या तत्त्वज्ञानमय महान् ग्रंथापासून तों व्रतखंडासारख्या आचारग्रंथापर्यंत सर्वांनाच मान्य आहे. व्रतवैकल्यांची ही आस्तिक दृष्टीनेंहि सर्वमान्य असलेली अुपपत्ति आहे तशीच स्वीकारली तरीदेखील जें जें व्रत त्या नारायणास संतोषवील तें तें पारमार्थिक दृष्टीस विश्वसनीय मानणाऱ्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त श्रद्धेलाहि, आपापली अिष्ट फलप्राप्ति करून देण्यास समर्थ आहे अशी निष्ठा बाळगण्यास मुळींच हरकत नाहीं.

## नारायणाचें खरें प्रतीक म्हणजे नरच होय.

आणि नारायणास नरांच्या सेवेहून अधिक संतोष देणारें साधन दुसऱ्या कोणत्या प्रतीकाच्या सेवेंत असूं शकणार आहे ? वडाची पूजा करण्यानें जर देव पावतो; गाडीची वा बैलाची पूजा केल्यानें जर देव पावतो; सापाला दूध पाजल्यानें जर देव पावतो, कावळ्यालां काकबली दिल्यानें जर देव पावतो, तर अनाथ अर्भकास वाटेवर टाकून दिलेलें पाहून त्यास दूध पाजण्यानें तो देव काय पावणार नाहीं ? जे का रंजले गांजले, त्यांसी म्हणे जो आपुले,

त्याचें तें परोपकारी मनुष्यसेवेचें पवित्र व्रत काय त्या देवास संतोषविणार नाहीं ? तान्हेल्याला पाणी, तापलेल्याला छाया, न जाणत्याला ज्ञानदान, मरणाऱ्याला प्राणदान: हीं पुण्यकृत्यें करण्याचें व्रत हें काय व्रतच नव्हे ? श्रुतिस्मृतिपुराणोक्त धार्मिक दृष्टीनेंहि ह्या मनुष्यसेवेलाच देवास संतुष्टविणारें महाव्रत मानलें नसतें तर पाणपोयी घालणें, वाटेनें वृक्ष लावणें, कथाकीर्तनें करणें, अतिथीस अन्न देणें प्रभृति अनेक दानांस नी आचारांस पुण्यप्रद गणलें असतें काय ? पण हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, यहुदी, पारशी-प्रभृति झाडून साऱ्या धर्मांतून हीं कृत्यें पुण्यकृत्येंच समजलेलीं आहेत. झाडांत, पशूंत, सापांत, दगडांत, मातींतहि जर देव आहे— जर तीं दगडमातीहि त्याचीं प्रतीकें होऊं शकतात, तर त्या देवाच्या जड-सृष्टीचाच नव्हे, तर चिच्छक्तीचाहि ज्यास शास्त्रेंच परमव्यक्त अंश मानतात, तो मनुष्य त्या देवाचें सर्वोच्च प्रतीक मानावयास नको काय ? नारायणाचा परमव्यक्त अंश, चिन्मय मूर्ति जर कोणची असेल तर तो नरच होय असेंच शास्त्रें म्हणतात आणि म्हणूनच त्या नराची सेवा अितर कोणच्याहि प्रतीकाच्या सेवेहून नारायणास अधिक संतोषविणारी असलीच पाहिजे. त्या अितर प्रतीकांच्या सेवेनें जें जें अैहिक काम्यफल मिळतें किंवा पारलौकिक पुण्य लागतें म्हणून पोथींत सांगितलें आहे तें जर खरें असेल, तर हेंहि खरें असलेंच पाहिजे कीं तें तें अैहिक वा पारलौकिक फल मनुष्याच्या सेवेनें, परोपकारव्रतानें अितर कोणच्याहि व्रतापेक्षां अधिक निश्चिततेनें व्रत करणारास मिळालेंच पाहिजे.

अर्थात् व्रतवैकल्याचे जे आत्मशुद्धि, काम्यफलप्राप्ति आणि पारलौकिक पुण्यप्रभृति हेतु आहेत, ते सर्व मनुष्यसेवेनें, परोपकाराच्या व्रतानें मिळणारे असल्यामुळें आपण व्रतांची निवड करतांना जर अशींच व्रतें निवडलीं, कीं त्यांच्यायोगें मनुष्यजातीचें प्रत्यक्षपणें कांहीं ना कांहींतरी हितच साधेल. आपल्या समाजाची वा राष्ट्राची कांहीं ना कांहींतरी हेचि देहीं हेचि डोळां फळ देणारी अुपयुक्त

सेवा घडूं शकेल आणि मनुष्यांच्या अज्ञानास वा धर्मभोळेपणास उत्तेजन न देतां त्यांचें ज्ञान नी सुख वाढविलें जाईल, तर या व्रत-विधींनींच देवास संतोषविण्याचें पारलौकिक पुण्य संपादून आपलें, आपल्या राष्ट्राचें आणि मानव्याचें हित साधण्याचें अैहिक फळहि अैथल्या अैथेंच आपणांस मिळवितां येअील.

व्रतानें देव पावतो; परलोकींचीं चांगलींवाअीट फळें येथल्या अैहिक बऱ्यावाअीट कृत्यांवरून मिळूं शकतात; मनुष्य ज्यास बरें-वाअीट म्हणतो त्यासच देवहि बरेंवाअीट म्हणतो अशी भावना असणाऱ्यांनाहि व्रतवैकल्यांची निवड करतांना वरील कसोटी अुप-योगी पडावी, संमत वाटावी, अशाच दृष्टीनें तिला समर्थिणारा कोटिक्रम वर केलेला आहे. कारण ज्यांची निष्ठा देव, परलोक, नीतिअनीति ह्यांविषयीं अशी 'धार्मिक' छापाची मुळांतच नाहीं, सृष्टिनियमांच्या अबाधित कार्यकारणभावास देवाच्या काल्पनिक



मनुस्मृति म्हणते खग्रास सूर्यग्रहण पाहूं नये. युरोपिय ज्योतिर्विद खग्रास सूर्यग्रहण असेल तिथेंच जातात व अनिमेष निरीक्षण करतात.

प्रसन्नतेनें वा रोषानें बदलून घेण्याची आशा हीं भावड्या माणसांची सुखस्वप्नें असून त्या दृष्टीनें होणारीं व्रतवैकल्यें हीं मुळांतच लटकीं आहेत असा ज्यांचा ठाम सिद्धांत ठरलेला आहे त्यांचा ह्या विषयांशीं संबंध पोचत नाहीं. ते व्रतवैकल्यें यांच्यापलीकडे गेलेले; त्यांना व्रतांची निवड करण्याचा विवेक सांगणें मूलतःच असंबद्ध होणार.

ह्यास्तव अेका बाजूस नितांत पोथीनिष्ठ असा धर्मभोळा वर्ग सोडून नी दुसऱ्या बाजूस नितांत विज्ञाननिष्ठ प्रत्यक्षवादी वर्ग वगळून जो मध्यम वर्ग अुरतो आणि आज ज्याची संख्या भरपूर आहे त्याला अुद्देशूनच व्रतांत निवड कशी करावी नी कां करावी हें वर सांगितलेलें आहे. हा बहुसंख्याक वर्ग धार्मिक असला तरी धर्मभोळा नाहीं. विज्ञाननिष्ठच नसला तरी बुद्धिवादास अगदींच पारखा नाहीं. व्रतवैकल्यांकडे त्यांची प्रवृत्ति असली तरी तीं व्रतें अगदीं वेडसर अज्ञानावर अुभारलेलीं नसावीं आणि शक्य तों समाजास प्रत्यक्षपणें अैहिकदृष्ट्याहि अुपयोगी असावीं हें तत्त्व तो सहसा नाकारणारा नाहीं तो वरील कारणासाठीं व्रतांची निवड करतांना खालील सूत्रें लक्षांत ठेवून त्या कसोटीस अुतरतील तींच व्रतें आचरण्यास बहुधा सिद्ध होअील. वर विशदिलेल्या कोटिक्रमानुसार ठरणारी व्रतांची कसोटी ज्या सूत्रांत थोडक्यांत ह्या लेखापुरती समारोपितां येतील तीं सूत्रें हीं–

—१—

ज्या व्रतांतील देवता आणि त्यांचीं वर्णनें आजच्या प्रयोगक्षम विज्ञानानें साफ खोटीं पडलेलीं आहेत; सृष्टिविज्ञानाच्या प्राचीन अज्ञानामुळेंच ज्या घटनांना वा निर्जीव वस्तूंना सजीव देव समजलें गेलें, त्यांना प्रसादविण्यासाठींच जीं व्रतें प्रचलविलीं गेलीं तीं सर्वं व्रतें आज टाकाअू मानलीं जावींत. मनुष्याच्या आजच्या वैज्ञानिक सिद्धांतांच्या प्रसारानें जनतेस अधिक डोळस करावयाचें सोडून हीं

व्रतें तिला आंधळीचीं आंधळी ठेवूं पाहातात. बुद्धीचा विकास खुंटवितात. अशीं व्रतें असत्याची पूजा होत. निव्वळ मिथ्याचार होत. या वर्गाच्या व्रताचें अुदाहरण हवें असेल, तर आकाशस्थ ज्योतिर्गोल-विषयक ग्रहणें— संक्रांत-सूर्यचंद्रपूजाप्रभृतिप्रीत्यर्थ आचारले जाणारे आमचे धर्मविधि पाहा!

—२—

देवांस प्रसन्न करण्यासाठीं, आत्मशुद्धीसाठीं, भूतदयेसाठीं किंवा कांहीं काम्य हेतूच्या सिद्धीस्तव केलीं जाणारीं जीं जीं व्रतें असतील तीं तीं आचरितांना त्यांचीं जुनीं रूपें आज निरर्थक, भाबडीं वा लबाडीचीं दिसतील तीं टाकून त्याच हेतूनें, त्याच काम्यफला-साठीं, तींच व्रतें अशा रूपांत करावीं, कीं ज्यायोगें त्यांच्यासाठीं कराव्या लागणाऱ्या कर्मांनीं आणि दानांनीं आजच्या परिस्थितींत आपल्या हिंदु राष्ट्रास अत्यंत आवश्यक असलेली कोणती तरी प्रत्यक्ष हितकारक सेवा घडेल. **'ह्या दानानें वा कर्मानें माझ्या राष्ट्राची कांहींतरी प्रत्यक्ष सेवा घडत आहे ना?'** ही कसोटी प्रत्येक व्रताच्या कर्मास वा दानास लावली कीं संपलें. तो व्रतविधि त्या कसोटीस अुतरला नाहीं तर तो साफ सोडून द्यावा नी त्याच काम्य वा निष्काम हेतूनें हिंदु राष्ट्राची प्रत्यक्ष सेवा ज्यांत घडेल अशा विधीनें तें व्रत सांग करावें. नराच्या प्रत्यक्ष सेवेहून म्हणजेच राष्ट्राच्या प्रत्यक्ष सेवेहून नारायणाची सेवा करण्याचें योग्यतर साधन मनुष्याच्या हातीं दुसरें कोणचेंहि नसल्यानें शास्त्रेंहि नरासच नारायणाची अवतारार्ह विभूति मानीत असल्यानें, त्या राष्ट्रसेवेनें देव अितर कोणत्याहि पूजनाहून अधिक संतुष्ट झालाच पाहिजे आणि तें तें काम्यफल त्या त्या सेवकाला पोंचवीत असलाच पाहिजे. जर व्रतांची पारलौकिक वा काम्य फलश्रुति सत्य असेल तर! पण जरी क्वचित् तें पारलौकिक फल कल्पित ठरलें वा निष्फळलें तरीदेखील त्या व्रतार्थ केलेलीं अशीं राष्ट्रसेवेचीं कर्में

वा दिलेलीं राष्ट्रार्थ दानें हीं ऐहिक दृष्टीनें तरी केव्हांहि निष्फळ् शकणार नाहींत. कारण त्यांच्यायोगें प्रत्यक्षपणें आपल्या हिंदुराष्ट्राच्या म्हणजेच हिंदुधर्माच्या हितास जें सहाय्य होईल तें अैहिक फळ तरी पदरांत पडेलच पडेल. त्या मानानें आत्मशुद्धीहि होअील; सद्धर्महि घडेल.

ह्या दोन सूत्रांची कसोटी प्रत्येक व्रतास लावून दाखविणें हें अशा लेखांत जरी असाध्य असलें, तरी दिग्दर्शनापुरतें कसोटीवर व्रतें कशीं पारखावीं ह्याचीं कांहीं अुदाहरणें देत आहोंत.

— ३ —

## ज्योतिर्गोलविषयक सारी पूजाअर्चा नी व्रतवैकल्यें साफ खोटीं असल्यामुळें आजच्या आज टाकून द्यावयास हवींत !

**ग्रहणें**—हें अशा टाकाअू धर्मविधीचें अेक अुत्तम अुदाहरण आहे. पूर्वीं रानटी स्थितींत मनुष्याला ग्रहणाचे नियम माहीत नसत; तेव्हां आकाशांत सूर्य वा चंद्र दिसतांदिसतां अवेळीं नाहींसा होत चाललेला पाहून केवढें आश्चर्य नी भीति वाटत असेल ह्याची कल्पना आजहि आपणांस सहज करतां येअील. आकाशांत अेकदम दोन सूर्य अेकाद्या दिवशीं दिसूं लागले तर आजहि तशी भयविव्हल अधीरता आपल्यासहि वाटल्यावांचून राहाणार नाहीं. अैतिहासिक काळांतहि रानटी लोकांच्या ह्या भयाचे अनेक पुरावे सांपडतात. अुदाहरणार्थ, कोलंबसाविषयीं आख्यायिका पाहा. अमेरिकेंतील मूळवासी रानटी लोकांना ग्रहण केव्हां येतें तें वर्तवितां येत नसे. यास्तव तें त्यांना देवाच्या कोपाचेंच अनियमित नी भीतिप्रद चिन्ह वाटे. कोलंबसाच्या लोकांना ग्रहणें आधीं वर्तवितां येत, त्यामुळें अमेरिकनांस

त्यांनीं भिवविलें, कीं जर तुम्ही आम्हांस शरण न याल तर आमचा देव येत्या अमुक दिवशीं अमक्या वेळीं आकाशांतून सूर्यासहि नाहींसा करील ! त्या धमकावणीप्रमाणें नक्की त्याच वेळीं सूर्य नाहींसा होअूं लागला— कारण तो ग्रहणाचा दिवस होता ! घाबरलेले ते मूळ-वासीय कोलंबसास शरण येअून 'देवाचा राग शांत करा !' म्हणून प्रार्थूं लागले; कोलंबसाच्या लोकांनींहि अुःशाप दिला, कीं ' अमक्या वेळेस सूर्य परत देअूं ' आणि बरोबर त्याच वेळीं सूर्य आकाशांत पुन्हा पूर्णपणें प्रकाशूं लागला ! ह्या साध्या भाकितानें त्या मूळवासीयांवर कोलंबसाच्या सैन्याच्या अद्‌भूत शक्तीचा केवढा परिणाम झाला असेल ! ते अमेरिकन त्या नवागत लोकांस अजिक्य असे 'राक्षसदूत' किंवा 'देवदूत' समजूं लागल्यास त्यांत काय नवल आहे ! अशा रानटी अज्ञानाच्या काळीं ग्रहणासरशीं भयभीत होअून त्या अीश्वरी कोपास पुण्यकृत्यांनीं शांतविण्यास्तव लोक 'दे दान सुटे गिऱ्हाण' म्हणून आरडत नी दानें देत; स्नानें करीत; तें सूर्याचें सुतक सुटतांच कपडे धुवून, झाडूनसारवून त्या संकटाच्या विटाळांतून मुक्त होत; तें साहजिकच होतें. कित्येक जाति बहुधा चेटकानें आपण ग्रहण लावतों असेंहि भासवीत असाव्यात आणि तें खरें वाटून त्यांस दान देअून, संतोषवून ग्रहण सोडवणें अितरांस भाग पडत असावें. राहूकेतू हे दैत्य, राक्षस; त्यांचें वंशज नी सगेसोयरे म्हणजेच गांवाबाहेर राहाणारे ते 'अुग्र', मांग, चेटके, गारुडी, महारप्रभृति चांडालवर्ग ! म्हणून बहुधा तेंच आरडत फिरण्याचीहि वहिवाट पडली असावी, ' दे दान सुटे गिऱ्हाण ! ' दान द्याल तर आमचें चेटूक मागें घेअून हें गिऱ्हाण आम्ही सोडवितों !

तें कांहीं असलें तरी आज विज्ञानानें ग्रहणांचे नियम नी कारणें अशीं सुनिश्चितपणें ठरवून टाकलीं आहेत कीं जसें बे बे चार ! तुम्ही दान द्याल तरी तें ग्रहण अेक पळहि आधीं सुटत नाहीं. न दिलेंत तरी अेक पळहि अधिक टिकत नाहीं. तिथें देवादानवांची कोणाचीहि खरोखरी लढाअी होत नाहीं; ती सगळी कथा सुंदर रूपक आहे.

जशा हितोपदेशांतील कुत्र्यामांजरांच्या कल्पित गोष्टी तसेंच अगदीं सर्वांशीं कल्पित ! त्याच्याशीं देवाच्या रागालोभाचा लवलेश संबंध नाहीं.

आपल्या आज अगदीं टाकावू ठरलेल्या रूढि पूर्वीच्या अज्ञानाच्या वा भिन्न परिस्थितीच्या काळांत खऱ्या वा हितकारक वाटणें साहजिकच होतें. हें समर्थन पुरेंसें न वाटून त्यांचें समर्थन आजच्या विज्ञानाच्या दृष्टीनेंहि करूं पाहाणारा जो अेक वर्ग आहे, त्याचा कोटिक्रम तर त्या रूढीस अधिकच हास्यास्पद करून सोडतो. कसें तर या ग्रहणांच्या प्रकरणींच पाहा ! ते ह्मणतील, 'अहो, ग्रहणाच्या वेळीं अेकंदर वातावरणांत मोठी चलबिचल होते !' 'बरं होते. पुढं ?' 'त्याचा मनुष्याच्या शरिरावर नी पृथ्वीवरील वस्तूंवर मोठा परिणाम होतो.' 'बरं, होतो. पुढं ?' 'अहो, पुढ काय ! म्हणूनच आमचं आरोग्य राखण्यासाठींच त्रिकालदर्शी ऋषींनीं ह्या रूढि पाडल्या, कीं ग्रहणाच्या वेधांत खाअूं नये; लोणच्यांची बरणी, पापडांचे डबे, मोरावळ्याची बाटली यांवर तुळशीपत्रें ठेवावीं; चांडाल, मांग, महारांस फाटकीं वस्त्रें द्यावीं, ब्राम्हणांस दानें द्यावीं; ग्रहणें लागतां सुटतां स्नानें करावीं; गायत्री जपजाप्य यांचा धूमधडाका अुडवावा !'

ग्रहणांमुळें वातावरणांत हवे ते फेरफार होत असले तरी डबे, बाटल्या, बरण्यावर तुळशीपत्रें ठेवल्यानें आंतील लोणचीं, पापड, मोरावळे यांवरील अनिष्ट परिणाम टळतात; तेव्हां सृष्टिविज्ञानाचा नियम अजब खरा ! आणि जर डब्याबरणीवर, शालीपैठणींवर तुळशीपत्रें ठेवल्यानें ग्रहणाचें संकट टळतें, तर त्या घरावरच तुळशीपत्रांचा बुचका टाकून मोकळें कां होअूं नये ? म्हणजे मग घरांतील कपडेपदार्थांवर प्रत्येकीं तुळशीपत्र टाकणें नको. ग्रहणांत जेवल्यानें हिंदु लोकांचेंच आरोग्य तेवढें बिघडतें असें दिसतें. कारण युरोप, अमेरिका चीन, जपान सारें जग ग्रहणांतून जेवतहि असतें आणि जगतहि

असतें ! तिकडे कोणच्याहि भयंकर सांथी-ग्रहणांत पाणी पिल्यानें, कपडे न धुतल्यानें, महारांस वा ब्राम्हणांस दान न दिल्यानें, जपजाप्य न केल्यानें ग्रहणानंतर पडल्याचें फारसें अैकिवांत नाहीं ! त्यांचें वायुमान निराळें, हिंदुस्थानचें वातावरण निराळें, म्हणून पुन्हा अेका भौतिक विज्ञानाच्या नांवें थाप ठोकाल तर तुम्हांस तीहि सोय नाहीं. कारण आधीं अेकाच गांवांत घराला लागून असणाऱ्या घरांत नी पेठांत हिंदुमुसलमान ज्यू, ख्रिस्ती, पारशी जे राहातात त्यांपैकीं तुळशीपत्राखालील लोणचें खाल्लें म्हणून तो जगला नी तुळशीपत्र नसलेल्या एका बरणींतलें लोणचें नी ताजा भात ग्रहणांत जेवला तो अुठतो तोंच पोट फुगून मेला असें कधींहि घडत नाहीं !

मनुस्मृतींत निषेध आहे, कीं 'नेक्षतोद्यन्तमादित्यं स्नातं ग्रस्तं कदाचन । नोपस्पृष्टं न वारिस्थं न मध्यनभसो गतं ॥




जर डब्याबरण्यांवर तुळशीपत्र ठेवल्यानें ग्रह
णाचें संकट टळतें तर घरावर तुळशी-
पत्राचा बुचका टाकून मोकळें कां होअूं नये ?

(अ. ४, ३७) अुगवतांना, ग्रहण लागतांना, खग्रास ग्रहणांत, पाण्यांत वा मध्यान्हीं सूर्यास मुळीं पाहूंच नये ! आतां या कोणत्याहि अवस्थेंत, आकाशांत वा पाण्यांतहि जर सूर्यास पाहावयाचें नाहीं, तर आह्मीं त्यास पाहावें तरी कुठें ? चित्रांत कीं काय ! सूर्याविषयींची कांहीं प्रकारची वैज्ञानिक माहिती त्यांतल्या त्यांत जर केव्हां अुत्कृष्टपणें निरीक्षितां येत असेल तर ती त्याच्या ग्रहणाच्या वेळींच होय. अेवढयासाठीं युरोपीय जोतिर्विद मोठया प्रयासानें हजारों मैलांचा प्रवास करून सूर्यग्रहण खग्रास असेल तिथेंच जातात नी अनिमेष निरीक्षण करतात; पण आमची मनस्मृति ह्मणते, खग्रास सूर्यग्रहण मुळीं पाहूंच नये !

ह्या सूर्यचंद्रांच्या ग्रहणांविषयीं प्राचीन काळच्या अज्ञानयुगांत अशा आज साफ चुकीच्या ठरलेल्या अनेक विक्षिप्त समजुती जगांतील यच्चावत् मनुष्यसमाजांत प्रचलित होत्या— केवळ आपल्या हिंदूंतच नव्हेत; पण आजच्या युरोपियन समाजासारख्या विज्ञाननिष्ठ प्रगत लोकांनीं त्या प्रत्यक्षसिद्ध ज्ञानाच्या अुलट आहेत असें दिसतांच जशा तत्काळ सोडून दिल्या, तसेंच आम्हींहि आतां करावयास हवें आणि ग्रहणांविषयींचीं वर वर्णिलेलीं सारी धर्मभोळी अज्ञानजन्य विधिविधानें मुळींच टाकून दिलीं पाहिजेत.

**संक्रांत**— जी गोष्ट ग्रहणांची तीच संक्रांतीप्रीत्यर्थ आपण करीत असलेल्या धर्मविधींची. सूर्य आणि चंद्र हे कोणी खरोखरीचें सजीव, समनस्क प्राणी असून राहूकेतु हे कोणी खरोखरीचे अक्राळविक्राळ दैत्य आहेत अशी जनतेची भाकड समजूत करून देण्यास त्या ग्रहणांवरचीं कल्पित रूपकें नी कथा कारण झाल्या; तशाच या संक्रांतीनिमित्त प्रतिवर्षीं पंचांगांत प्रसिद्ध होणारीं भाकड रूपकें लक्षावधि सामान्य लोकांचें त्या मकरसंक्रमणाच्या साध्या घटनेविषयींचें अज्ञान धर्माच्या नांवें वाढविण्याची नी टिकविण्याची फसवेगिरी करीत आहेत ! प्रत्येक ज्योतिर्गोलाच्या गतिस्थितीचा

पृथ्वीवर नी मनुष्यांवर परिणाम होतो हें वैज्ञानिक सत्य आहे. जसा पाऊसाचा, अुन्हाचा, प्लेगचा तसाच तोहि. पण तो परिणाम त्या संक्रांतप्रभृति ज्योतिर्गोलांच्या नियमबद्ध गतिस्थितीस देवता कल्पून त्यांस गंधफुलें वाहून वा त्यांप्रीत्यर्थ मडक्यांचीं गाडग्यांचीं दानें देअून तीं तीं व्रतें आचरण्यानें टळूं शकतो असें शिकवीत घरोघर फिरणें ही मात्र निव्वळ ठकबाजी आहे. ज्योतिर्गोलांच्या गतिस्थितीचे परिणाम गणिताच्या अुत्तरासारखीं सुनिश्चित सृष्टिक्रमाचीं फलितें होत. तीं माझ्या खेड्यांतल्या कोण्या शामभटाला मीं जेवायला बोलाविलें वा न बोलाविलें तरी घटणार कशीं; वाढणार कशीं ! चारां पंचे वीस, हें अुत्तर जसें मीं त्या चाराला वा पांचाला संतोषविण्यासाठीं गंध वाहिलें; तीळ वाहिले; गाडगीं दान दिलीं, तरी वीसाचे दहा होणें नाहीं; तीस होणें नाहीं, तर ठाम वीसचे वीसच राहाणारें आहे; तशींच मकरसंक्रमण ग्रहणप्रभृति ज्योतिर्गोलांच्या स्थितिगतींचीं फळें.



या संक्रांतीला हिंदु थरथर कांपतात— पश्चिमेच्या वाटेस जातांच तिची गांठ पडणार मशिनगन्सशीं !

या पंचांगावर छापलेलें संक्रांतीचें विचित्र सोंग नी तिचें वेडगळ स्तोम पाहा ! ' ती पक्षी जातीची आहे ' आणि तरीहि त्या पक्ष्यानें माणसासारखा ' गोपीचंदनाचा तिलक कपाळास लावून केवडयाच्या पाकळया हातांत वासासाठीं घेतल्या आहेत ! ' ती येतें पश्चिमेकडून व जाते पूर्वेला, पाहाते अग्नेयेकडे ! अेकीकडे जातांना भलतीकडेच पाहात ठोकरा खाणाऱ्या आजच्या हिंदुमनी वृत्तीची ती सुयोग्य ध्येय आहे. दुसरें काय ! सुदैवानें तिला तोंड अेकच आहे; पण हात आठ आहेत आणि तिचे ' ओठ नी नाक लांब आहे ! ' मकर-संक्रमण या घटनेला नाक आहे ! अुद्यां गुरुत्वाकर्षणाला केंस आहेत नी त्याला कामिनिया तेल लावलेलें आहे असें सांगून अेकादें अद्या-वत् दैवत कोणीं पुजूं लागल्यास कांहीं हंसावयास नको ! त्या अर्थाचें अेक संस्कृत अनुष्टुप् रचून भविष्यपुराणाच्या सतत वाढत्या अध्या-यांत घुसडलें कीं आटोपलें ! पण या वर्षीच्या संक्रांतीनें केलेली अेक गोष्ट मात्र अगदीं योग्य आहे; ती ही, कीं तिचें वाहन आहे—गाढव ! असल्या कल्पनेला वाहून नेण्यास बैलदेखील आपल्या शाहाणपणास कमीपणा आणणारें मानीत असावा. यासाठींच बहुधा या विमान-वाहनांच्या युगांतहि वाहन गाढवच पसंत केलें असावें ! असल्या कार्यीं कार्यवाह होण्याचें शाहाणपण गाढवावांचून दुसऱ्या कोणांत आढळणारें आहे !

ह्या संक्रांतीच्या पर्वकालांत ' गाअीम्हशींचें दूध काढूं नये; गवत तोडूं नये आणि दांत घांसूं नये ! ' तसल्या गदळ तोंडानें त्या पर्वाच्या स्तोत्राचे भपकारे सोडीत बसावें ! आणि सगळयांत मुख्य गोष्ट म्हणजे दानें द्यावीं— ब्राम्हणांस दानें द्यावीं ! तीं म्हणजे लोकरीचीं वस्त्रें, तूप, भूमि, गाय आणि सुवर्ण ! आमच्या खेडयां-तील बाळंभटाला हें तूप, गाय नी सुवर्ण दिलें, कीं पृथ्वी नी सूर्य ह्यांच्या त्या गतिस्थिति यथावत् होअून मकरसंक्रमणाची सुखप्रसूति होअील. पण जर तेवढयांत यजमानानें दांत घांसले किंवा बाळं-भटाला तूप मिळालें नाहीं तर— तर काय ! तर तें मकरसंक्रमण खाड्कन ठेचाळेल; सूर्य, पृथ्वी, ब्रम्हांड ठिकाणच्या ठिकाणीं थांबेल !

आणि ' ह्या संक्रातीच्या कृपेनें पश्चिम दिशेचे लोक सुखी होतील आणि पूर्व दिशेवर तिच्या रोषानें संकटें येतील; त्या लोकांची दुर्दशा होअील ! ' तें ठीकच आहे ! कारण पूर्व दिशेचे हे बिचारे हिंदु त्यांतल्या त्यांत तिची पूजाअर्चा करतात; तिचीं स्तोत्रें गातात; तिच्या नांवानें दानें देतात; तिचा सारखा बडेजाव ठेवून थरथर कांपत असतात म्हणून त्यांच्यावरच ती संक्रांत यावी हें साहजिकच आहे ! पश्चिमेचे लोक जरी तिला दमडीचा धूपहि कधीं जाळीत नाहींत; तिच्या व्रतांची टर अुडवून तिच्या पर्वकाळांत दूध पितात; मांस खातात; दारू झोकतात; दमडीचें दान कधीं देत नाहींत; दांत घांसतात तरी त्यांचे दांत कधींच कुणी पाडीत नाहीं. संक्रांत पाडते दांत 'पूर्वेकडच्या' लोकांचे—म्हणजेच हिंदूंचे ! कारण पश्चिमेकडे वक्र दृष्टीनें पाहाण्याची संक्रांतीची छातीच नाहीं. त्या पश्चिमेच्या वाटेस जातांच गांठ पडणार मशीनगन्सशीं, तोफांशीं, बेडरांशीं, बॉबशीं ! म्हणून आज शतकोशतकें संक्रांत त्यांचें कांहीं अेक वांकडें करीत नाहीं आणि शतकोशतकें ह्या हिंदुस्थानच्या अुरावर जी ती बसली आहे ती अुठतां अुठत नाहीं ! ह्यावरूनहि संक्रांतीस प्रसन्नविण्यासाठीं म्हणून सांगितलीं जाणारीं हीं बाष्कळ व्रतें नी धर्मविधि किती खुळचट नी खोटे आहेत हें अुघड होत नाहीं काय ?

तेव्हां या प्राचीन युगांत जितक्या क्षम्य तितक्याच या विज्ञान युगांत आतां अक्षम्य ठरलेल्या ह्या धर्मभोळ्या कथांना नी व्रतांना पंचांगांत यापुढेंहि छापून अज्ञ जनतेला कोणींहि फसवूं नये हेंच अुचित नी हाच धर्म आहे. गाढवावर बसणाऱ्या त्या संक्रांतीच्या विक्षिप्त चित्रास नी चरित्रास फांटा देअून यापुढें तरी ज्योतिष-शास्त्रांतील त्या संक्रमणाची अद्यावत् सत्य ती माहिती गणितशास्त्रीय निश्चित सिद्धांतांसह प्रत्येक पंचांगांत छापावी. तो मकरसंक्रमणांचा खरा भौतिक अर्थ घरोघर शिष्टांनीं वाचून दाखवावा आणि अज्ञांस विज्ञ करण्याचें पुण्य पदरीं बांधावें. संक्रांतीस प्रसन्नविण्यास तीं भाबडीं

व्रतें नी विधि पार झुगारून देअून त्या सणास, अिष्टमित्रांस 'तिळ-गुळ घ्या गोड बोला' ही प्रेमळ विनंति करीत हलवा देण्याचा त्या हलव्याअितकाच स्निग्ध नी मधुर प्रघात काय तो चालू ठेवावा; त्या सणास 'सार्वजनिक तिळगुळा'चे समारंभ करण्याचा पडत असलेला प्रघातहि समाजसंघटनेच्या दृष्टीनें फारच चांगला आहे.

## शनिप्रभृति ग्रहोपग्रह

ह्यांचीं माजलेलीं स्तोमेंहि आज तशीच वायफळ ठरलेलीं आहेत. त्या देवता आहेत असें आतां मानीत राहाणें हा तर निव्वळ आंधळेपणा आहेच; पण त्याहूनहि आंधळा नी अगदीं हास्यास्पद धर्म-भोळेपणा हा, कीं तो शनि व मंगळ पृथ्वीवरल्या अेकाद्या दगडास शेंदूर लाअून नी तेल ओतून शनिमाहात्म्याची पोथी वाचली वा कोण्या गोम्यासोम्यास दोन मुठी तांदूळ दिले, कीं प्रसादतो नी न दिले कीं रागावतो असा अुपदेश देत सुटावें! कसला शनि नी कसलें शनिमाहात्म्य! अहो, या ब्रह्मांडाच्या विस्तीर्ण म्युनिसिपालिटीनें आकाशप्रांगणांत सृष्टिनियमांनुसार लावलेले हे सारे कंदील आहेत. त्या कंदिलांत ठराविक तेजाचें घासलेट घातलेलें आहे, तोंवर तुह्मी त्यांस लाखों शिव्या देत राहिलेत तरी ते जळल्यावांचून राहाणार नाहींत. तें तेजाचें घासलेट जळत असतां ठराविक चटके– तुह्मी या दगडास तेलाची नी शेंदराची कितीहि पुटें चढविलींत तरी प्रसादून देण्याची सोडणार नाहींत आणि तें घासलेट संपलें कीं तुह्मी कितीहि काकुळतीनें प्रार्थिलें तरी विझल्यावांचून राहाणार नाहींत. शनि जर शनिमाहात्म्याच्या भाकड पोथीनें प्रसन्न होतो तर या लांकडी खांबावर लावलेल्या या गांवांतील सडकेवरचा हा घासलेटी कंदीलहि कोण्या कंदीलमाहात्म्यानें कां प्रसादू नये?– घासलेटावांचून जळू नये? शनिमाहात्म्याप्रमाणें कंदीलमाहात्म्यहि रचणें कांहीं मोठें कठीण नाहीं. तें तसें कंदीलमाहात्म्य रचून शनवारचा अुपास करून, पाट मांडून या समोरच्या कंदिलाप्रीत्यर्थ भक्तिपूर्वक जर ती ती पोथी आह्मी वाचूं लागलों, कीं–

ओम् जयजयाजी कंदिला
म्युनिसिपल यशोमंदिला
काळोखासुराच्या धुंदिला
अुतरविता तूं तत्क्षणीं ॥ १ ॥

राकेल डबा ज्याचा पिता
आगपेटी धन्या माता
हे कंदिलदेवा समर्था
दीपोज्यौतिर्नमोस्तु ते ॥ २ ॥

हा कंदिलवाला नौकर
तुझिया डब्यांत राकेल



ओम् जयजयाजी कंदिला
म्युनिसिपल यशोमंदिला—

घाली थोडें चोरी फार
काळोख्याचि रात्रीं नेमानें ॥ ३ ॥

यास्तव करी मी नवस
मावळतांची दिवस
मालवें न तूं! परी प्रकाश
घासलेटावांचोनी ॥ ४ ॥

पावसी जरी या नवसास
ब्राम्हण घालीन दहावीस
लागु दे निदानीं न ठोकरीस
आम्हां तुझ्याची खांबाच्या ॥ ५ ॥

तर अशा कंदीलमाहात्म्यानें जसा हा कंदील घासलेटावांचून प्रकाशणार नाहीं तसाच तो शनि– तो आकाशभर पेटलेला आगीचा अेक डोंबाळा!

## तसेच हे सूर्य आणि चंद्र!–

हा दिवसाचा सम्राट नी तो रजनीचा कान्त पाहा! हें अन्न, हें जल, हे सुगंध, हे सुरंग, ही अुष्णता नी हें जीवन विशेषत: ज्याच्या अस्तित्वामुळेंच प्रकर्षेंकरून प्राणिमात्रांस ह्या भूमंडलावर लाभूं शकत आहे त्या ह्या सूर्याचे अुपकार कुठवर वर्णावे! त्याचें तें दिव्य, हिरण्मय, दैदीप्यमान तेजोमंडल पाहातांच मनुष्याचे नेत्रच नव्हेत, तर बुद्धीहि दिपून जाते! त्या महनीय विभूतिमत्वानें आदर नी त्या अत्यंत अुपकारित्वानें कृतज्ञता यांहीं भरून जाअून त्या भगवान् अंशुमालीस त्या वेदकालीन रसिक ॠषींनाच काय; पण आजच्या अेकाद्या रखरखीत नास्तिकालाहि वारंवार वंदिल्यावांचून राहावणार नाहीं! आणि त्याचप्रमाणें जेव्हां 'ततः कुमुदनाथेन कामिनीगण्डपाण्डुना।

नेत्रानंदन चंद्रेण माहेन्द्री 'दिगलंकृता' होअून शोभूं लागतें तेव्हां त्या पूर्णचंद्राच्या दर्शनासरशीं समुद्राचें खारें पाणीदेखील जिथें अुद्वेलित होतें, तिथें हृदयाचे सारे रस अुल्लसूं लागतात यांत काय नवल ! प्रेमानें आणि आदरानें भारून गेलेलें मन क्षणभर सजीव नी निर्जीव सृष्टीचा विलगपणा विसरून त्या तेजोद्वयांस आज युगानुयुगें जे पुजूं जात आहे; भजूं पाहात आहे तें अगदीं साहाजिकच आहे !

परंतु शिवरायाचा पुतळा पाहून आपण आदरानें अवनतमस्तक होअून त्यास जो प्रमाण करतों नी पुष्पगुच्छ वाहतों तें निराळें नी त्या पुतळयास कमी जिवंत शिवाजीच मानून त्यानें प्रसादावें म्हणून अुपास करणें, त्याचे पाय रगडणें, त्याला खरा घोडा देअून त्यावर चढ म्हणून आग्रह करणें नी तशा व्रतानें तो पुतळा त्या घोड्यावर बसून हा हिंदुस्थान देश स्वतंत्र करण्यास पुन्हा निघणार म्हणून अपेक्षा करणें हें निराळें ! तसेंच सूर्यचंद्राच्या दर्शनासरशीं आदर नी प्रेम अुत्पन्न होणें निराळें आणि त्यांस सजीव देवता मानून आपणांस अिष्ट फ़लें आपण त्यांची स्तुति केल्यानें वा अर्घ्य दिल्यानें वा बारा सूर्यनमस्कार घातल्यानें देतात नी तसें न केलें तरी रागावून आपली हानि करतात असें विश्वसणें हें निराळें ! पुन्हा असें पाहा कीं—

## जसा प्राणदायक तसाच प्राणहारकहि आहे हा सूर्य !

थंडीनें गारठलेल्या मनुष्याला सूर्याचे किरण प्राणदायक भासतात; पण त्याच किरणांची प्रमाणाबाहेर झळ लागतांच माणूस पटकन् मरून पडतो ! सूर्यशनींना प्रसादविण्याचें व्रत करा वा करूं नका; अुष्णतेचें जें ठराविक परिमाण मनुष्य जगवावयास वा मारावयास कारण होतें, तें कांहीं केल्या व्रतांमुळें, सूर्याच्या रागामुळें वा लोभामुळें बदलूं शकत नाहीं. मनुष्यजगताच्या प्रभवाला कारणीभूत

होणारा :हा सूर्यच त्याच्या प्रळयाचेंहि कारण होणारा आहे– झालेला आहे ! मनुष्यजातीच्या अज्ञानाअवस्थेंत सूर्यशनीच्या आंतरंचनेचें नी गुणांचें ज्ञान नसल्यामुळें व्रतविधींहीं आणि प्रणामांहीं ते प्रसन्न होअून तसें न वागणारांपेक्षां वागणारांस ममतेनें वागदितील असें वाटणें साहजिक होतें. पण आतां युगानुयुगांच्या मनुष्यांच्या अुलटसुलट अनुभवांनीं ते ज्योतिर्गोल निर्जीव व ठराविक सृष्टिनियमांहीं बद्ध असल्याचें समजून चुकलें आहे. त्या अनुभवानें

## हीं व्रतविधानें कशीं साफ खोटीं पडतात तें पाहा !

सूर्यास संतोषविणारी गायत्री मुखानें सारखी जपत जरी कोणी ब्राह्मण वा सूर्यपूजक पारशी भर मध्यान्हीं अुष्ण कटिबंधांत अनवाणीं नी बोडका चालूं लागला तरी त्यास अुन्हाचे चटके, नास्तिकास लागतात त्याहून रेंसभरहि कमी लागत नाहींत ! अुलटपक्षीं जन्मांत गायित्रीचें अक्षरहि न अुच्चारणारा ब्राम्हण वा म्लेंच्छ सूर्यास सारखा शिव्या देत जरी चालला; पण पायांत अेक हातभर चामड्याचा जोडा नी डोअीवर दीड रुपडीची छत्री घेअून चालला– तर त्यास ते मध्यान्हींच्या अुन्हाचे चटके त्या वैज्ञानिक प्रमाणांत कमी लागल्यावांचून राहात नाहींत ! म्हणजे सूर्यास प्रसादविण्याचें धार्मिक साधन जें जप तें नसून वैज्ञानिक साधन जें जोडा तें होय ! जपापेक्षां जोड्यानेंच शनिसूर्यांची पीडा पुष्कळ कमी होते !

अहो, ह्या भारतवर्षांत ज्या आम्हां हिंदूंनीं सकाळसंध्याकाळ मध्यान्हीं सूर्यासाठीं भक्तिभरानें अर्घ्यांची संततधार युगानुयुगें सारखी वाहत ठेवली आहे आणि सूर्यस्तुतीच्या गायत्रीचा विश्वामित्रास तो महामंत्र प्रथम स्फुरला त्या प्राचीनतम क्षणापासून आजपर्यंत सारखा अखंड घोष चालूं ठेवला आहे त्याच आम्हां हिंदूंच्या साम्राज्यावर आज शतकोंशतकें त्या सूर्यानें पाठ फिरविली आहे; आमच्यां

आशेच्या साम्राज्यावर तो मुळींच अुगवत नाहीं! पण कधींच मावळत नाहीं कोणाच्या साम्राज्यावर? ज्यांनीं त्याला युगायुगांतून अेकदांहि अर्घ्य दिलेले नाहींत; गायत्रीचे जे घातक, सूर्यनमस्कारांवांचूनहि ज्यांचे स्नायु पोलादी, मणगटें वज्रमुष्टि, भर सूर्यग्रहणांत जेवणारे, सूर्यवंशाचे अुच्छेदक राहूचे नी केतूचे वेदबाह्य साथीदार त्यांच्याच साम्राज्यावर आज तो सूर्य मावळत नाहीं! प्राचीन सूर्योपासक बाबिलोन मिश्र मिसर-सोडा– ते आज झालेले आहेत नामशेषच! पण आजहि जीं दोनच राष्ट्रें सूर्योपासक आहेत तीं पारस नी भारत; त्यांच्याच राष्ट्रांवर आज राज्य आहे निराशेच्या अेकछत्री काळचाकभिन्न रात्रीचें! व्रतविधीनें सूर्य प्रसादत नाहीं– व्रतविधित्यागानें सूर्य रागावत नाहीं– याचें याहून अुत्कृष्ट प्रत्यक्ष प्रमाण दुसरें काय असणार! सूर्य सूर्याच्या सृष्टिनियमानें प्रवर्ततो; निवर्तता; आमच्या व्रतवैकल्यानें नव्हे; स्वेच्छेनेंहि नव्हे! तीच गोष्ट त्या शनीची, त्या संक्रांतीची, त्या ग्रहणांची, त्या मंगळाची, त्या साऱ्या भाकडकथांची. रस्त्याच्या प्रत्येक दगडाला शनिप्रीत्यर्थ शेंदूर फासून तेल चोळलें युगानुयुगें! पण त्या शनीची साडेसाती नेहमीं भोंवणार भारतासच! संक्रांत बसणार नेहमीं आमच्याच बोकांडीं; मंगळ आम्हांलाच काय तो अमंगळ; त्यांना जे दमडीचाहि धूप कधीं जाळीत नाहींत त्यांची अुलट चंगळ!

## व्रतानें नव्हे! विज्ञानानें!

तेव्हां व्रतविधींची निवड करतांना पहिला विवेक जो करावयाचा तो हा, कीं ज्योतिर्गोल ह्या निर्जीव वस्तु. त्या सूर्य, शनि, मंगळ, ग्रहण, संक्रांतप्रभृति ज्योतिर्गोलविषयक वस्तूंना वा घटनांना संतोषविण्यासाठीं म्हणून कोणतेंहि व्रतवैकल्य वा धर्मविधि करणें त्याज्य नी अधर्म्य मानलें पाहिजे. कारण ती असत्याची पूजा होते. समाजांत त्यायोगें त्या सृष्टपदार्थांच्या स्वरूपांविषयीं, शक्तींच्या

परिणामांविषयीं खरें ज्ञान प्रसारण्याच्या हितकर कार्यीं ह्या भाबडट समजुती तशाच चालूं ठेवल्यानें अडथळा येतो. त्यांच्या गतिस्थितींचे मनुष्यांवर जे प्रतिकूल परिणाम होतात ते गुरुत्वाकर्षण, भूमिकंप-प्रभृति घटनांच्या नी सृष्टिनियमांच्या प्रतिकूल परिणामांप्रमाणेंच टाळण्यास विज्ञानाच्या प्रत्यक्षनिष्ठ नी प्रयोगसिद्ध अुपायांनींच झटलें पाहिजे. या पोथीनिष्ठ नी लटक्या व्रतवैकल्यविधींनीं नव्हे !

आतां लेखाच्या आरंभीं दिलेल्या व्रतविधिविषयक दुसऱ्या सूत्राची चर्चा करून व्रतांतील जे आत्मशुद्ध, परोपकारप्रभृति अैहिक नी देवसंतर्पणप्रभृति पारमार्थिक हेतु आहेत ते यथावत् साधणारीं कोणतीं व्रतें निवडावीं याचें दिग्दर्शन या लेखाच्या अुत्तरार्धांत पुढील लेखांत करूं.



# व्रतविधि आणि विवेक

## [उत्तरार्ध]

या विषयाच्या पूर्वार्धांत जें विवेचन केलें त्यांतील मुख्य विधेयें (पॉइंट्स्) या अुत्तरार्धाच्या अनुसंधानार्थ अवश्य तितकीं प्रारंभींच अुल्लेखिणें भाग आहे. तीं विधेयें अशीं—

(१) धार्मिक श्रद्धेच्या दृष्टीनें देखील अीश्वर हा सत्यस्वरूप आहे. सत्य म्हणजे जें आहे तें आहे तसेंच मानणें. सृष्टीचें वा सृष्टिकर्त्याचें ज्ञान नी अुपासना म्हणजे त्या सत्याचीच अुपासना असली पाहिजे. 'न हि सत्यात्परो धर्मः नानृतात्पातकं परम्' हें लक्षण नुसतें सत्य बोलण्याच्या अेका व्यावहारिक आचाराचें नसून तें वर दिलेल्या अत्यंत व्यापक अशा तात्त्विक अर्थीच सर्व सुसंस्कृत धर्मांत संमतिलेलें आहे. तेव्हां ज्या ज्या व्रतांत आणि अुपासनेंत सृष्टीच्या यथातथ्य स्वरूपाची विकृति गृहीत धरलेली असते तीं सर्व व्रतें असत्याचीच अुपासना होत असल्यामुळें अधर्म्य

ठरतात. मनुष्यांत सत्याचा प्रसार करण्याचें धर्मकृत्य त्या व्रतांमुळें अडखळतें आणि असत्याचा प्रसार करीत राहाण्याचें पाप मात्र पदरीं पडतें. हजारों वर्षांपूर्वी अनेक वस्तूंच्या सत्यस्वरूपांचें ज्ञान मनुष्यास नव्हतें. त्या वेळेस त्यांना जें स्वरूप त्या काळच्या अपक्व ज्ञानामुळें सत्य वाटलें त्याची अुपासना करणारीं व्रतें, कथा, आख्यानें त्यांनीं प्रचलिविलीं यांत त्यांचा तितकासा दोष नाहीं. परंतु त्यांवर त्रिकालाबाधित धार्मिक सत्याचा छाप मारण्याच्या चुकीमुळें तें हजारों वर्षांपूर्वीचें मानवी अज्ञान चिरस्थायी करण्याचें पाप आतां आम्हीं मात्र करूं नये. प्रत्यक्ष निष्ठा नी प्रयोगक्षम विज्ञानाच्या प्रगतीनें ज्या ज्या पूर्वींच्या सृष्ट पदार्थांविषयींच्या कल्पना आज साफ खोटया पडल्या आहेत, त्या आपण जरी पूर्वीं त्यास धर्म समजलें गेलें असलें तरीहि असत्य म्हणून आज टाकून दिल्या पाहिजेत आणि त्या असत्याच्या पायावर अुभारलेलीं तत्तद्विषयक जीं जीं व्रतें वा अुपासना असतील त्या साफ सोडून दिल्या पाहिजेत.

(२) आज केवळ असत्याचीच पूजा ठरणाऱ्या अशा शेंकडों व्रतांचें अेक चटकन् लक्षांत येण्यासारखें अुदाहरण म्हणजे ज्योतिर्गोलविषयक व्रतांचा गट होय. चंद्रसूर्यशनिशुक्रमंगळप्रभृति ज्योतिर्गोल ह्या स्वतंत्र नी सजीव अशा देवता असून मनुष्याच्या स्तुतिनिंदेनें त्या प्रसादूं वा प्रक्षोभूं शकतात, अशी मनुष्याची पूर्वीं जगभर समजूत होती. आपल्या हिंदूंतच नव्हे, तर प्राचीन काळच्या बहुतेक राष्ट्रांतून नी धर्मांतून ही समजूत आणि तीवर आधारलेल्या त्यांच्या अुपासना, व्रतवैकल्यें प्रचलित असत. पण आतां ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीमुळें हें प्रयोगसिद्ध झालेलें आहे, कीं हे सारे ज्योतिर्गोल निर्जीव पदार्थ असून त्यांच्या गतिस्थिति ह्या गणिताच्या कठोर नियमांनीं बद्ध असून त्यांच्या प्रकाशघर्षणादिकांचे मनुष्यांवर होणारे परिणाम हे मनुष्यांच्या स्तुतिनिंदेनें अथवा ब्राह्मणभोजनानें वा महारांस दान दिल्यानें वा दगडास तेलशेंदूर फांसल्यानें वा शनिवारमंगळवारीं अुपाशी राहिल्यानें वा अर्घ्यप्रदानानें वा शनिमाहात्म्याच्या वा

सूर्यमाहात्म्याच्या पारायणानें लेशमात्र बदलूं शकत नाहींत. त्यांचे परिणाम टाळण्याचा मार्ग शनिमाहात्म्यांतील भाकडकथांप्रमाणें वागणें हा नसून, गणितरसायनवैद्यक या प्रयोगक्षम विज्ञानांच्या नियमांस समजून घेणें आणि त्यांच्या आधारें ते ते वैज्ञानिक प्रत्यक्ष फलदायी अुपाय योजणें हा होय. मनुष्यास हें ज्ञान आतां झालें असतांहि पूर्वीच्या अज्ञानाला 'धर्म' म्हणून अुराशीं बाळगणें आणि त्याची ती ती अुपासना, व्रतवैकल्यें करीत राहाणें ही असत्याचीच पूजा होणारी असल्यामुळें निर्भेळ अधर्म होय.

अगदीं ताजें अुदाहरण आगगाडीचें घ्या. हिंदुस्थानांत प्रथम आगगाडी आली, तेव्हां शेंकडों गांवकऱ्यांना ती अेक देवीच वाटली. ना घोडा, ना बैल, ना गाढव जुंपलेलें; पण अेखाद्या वाघिणीसारखी धांवते आहे भरमसाट ! अेक अद्भुत प्राणीच कोण्या अगम्य जंगलांतून सुटला नी गांवांत शिरला जसा ! आणि त्याची वीण वाढून जिकडेतिकडे आगगाडीच आगगाडी झाली ! अेखाद्या आतां नसलेल्या भुयाराचें तोंड फटकन् दगड अुचलतांच अुघडावें नी आंतून सापांचें पेव फुटून भराभर सापच साप जिकडेतिकडे धांवूं लागावे तसें तें आश्चर्य ! कित्येक वर्षें अनेक गांवकरी लोहपथाच्या तारांपाशीं तिष्ठत नी आगगाडी येतांच त्या देवीस प्रसादविण्यास्तव नवसाचे नारळ खटाखट फोडीत ! त्यांतल्या त्यांत अितकें बरें झालें, कीं केवळ अडाणी लोकांतच ही भावना राहिली आणि अुपाध्यायवर्गानें ती अंगिकारली नाहीं. पण जर का कोण्या पंडितास त्या देवतेवर कांहीं संस्कृत अनुष्टुपें रचण्याची क्लृप्ति सुचली असती तर आगगाडीविषयींच्या त्या अडाणीपणावर 'धर्मा'चें पुट चढून आपल्या नवसास पावणाऱ्या देवतांत अेका आगगाडीची नी अेका आगगाडीवाराची वा व्रताची चिरंतन भर पडली असती ! पण धार्मिक वर्गास दुसऱ्याच अेका कारणाकरितां तशी बुद्धि झाली नाहीं नी तें अडाणी-
 पण त्यावर धार्मिक छाप पडून चिरंतन होण्याचें संकट टळलें. तें

कारण असें, कीं ती आगगाडी तिच्या डब्यांत महारांसुद्धां साऱ्यांना सरमिसळ बसवी– सोळें नेसून बसण्याची त्या बयानें कोणतीहि स्वतंत्र सोय केली नव्हती ! यांमुळें ती धार्मिक पूजेस पात्र ठरली नाहीं, पण तरीहि धार्मिक निंदेस पात्र ठरलीच ! पुष्कळ वर्षांपर्यंत आगगाडी असतांहि अुपाध्याय नी भाविक वर्ग बैलगाडींतूनच तीर्थयात्रादिकांस जात नी आगगाडींतून वा आगनावेंतून प्रवासल्यानंतर कपड्यांसुद्धां स्नान केल्यावांचून घरांत प्रवेशत नसत ! पण आगगाडीची वा आगनावेची सारी कळ हजारों लोकांस प्रत्यक्षपणें कळतांच आतां आगगाडीस नुसता शिष्टाचाराचा कोणी नमस्कारदेखील करीत नाहीं– मग नवसाचा नारळ फोडणें दूरच ! आगगाडी, आगबोट, मोटारी यांच्यांतहि अपघात होतातच, प्राणहानीहि होते; पण ती त्या वस्तु रागावल्या म्हणून होते असें आतां गृहीत धरून अडाणी खेडवळदेखील त्यांत बसतांना त्यांच्याखालीं कोंबडें मारून वा त्यांना कुंकू लावून त्यांस प्रसादवीत बसत नाहीं. तर ते अपघात टाळण्यासाठीं रस्ते नीट करणें, त्यांचा दाब (ब्रेक) ठीक आहे कीं नाहीं तें पाहाणें, त्यांचें अेंजिन–गति–पेट्रोल यथावत प्रमाणांत ठेवणें या प्रत्यक्षसिद्ध अुपायांसच तेवढा अवलंबतो.

आगगाडी, आगनाव, मोटारीप्रमाणें निर्जीव नी भावनाशून्य असणाऱ्या ह्या ज्योतिर्गोलांनासुद्धां आतां यंत्रें म्हणूनच लेखिलें पाहिजे. **यापुढें प्रत्येक पंचांगांत, निदान टिळक पंचांगांत तरी मकरसंक्रमणाचा वैज्ञानिक अर्थ द्यावा; ग्रहणांचीं वैज्ञानिक कारणें द्यावीं; ग्रहांचे व्यास नी गति, सूर्यमालेची नी पृथ्वीची अवश्य ती आकृति वैज्ञानिक पारिभाषेंत निवेदावी आणि तें संक्रांतीचें सोंग नी तीं ग्रहणादिकांचीं भाकड वर्णनें साफ काढून टाकावीं.** लोकांना धडधडीत थापा मारून असत्यांत नी अज्ञानांत पंचांगप्रवर्तक मंडळासारख्या या सूज्ञ संस्थांना ठेववतें तरी कसें ! अशा विवेकाची कसोटी लावली असतां विज्ञानानें जी गोष्ट

घडघडीत असत्य म्हणून ठरविली आहे आणि प्रत्यक्ष प्रयोगानें जी तशी असत्य असल्याचें प्रत्ययास येअू शकतें तिची अुपासना, पूजा वा प्रचार करण्यास कारण होणारी ही चंद्रसूर्यग्रहोपग्रहादि ज्योतिर्गोल नी ग्रहणांसुद्धां ज्योतिर्घटना यांसंबंधींचीं पन्नाससाठ व्रतवैकल्यें निव्वळ असत्याची पूजा, निव्वळ अधर्म ठरतात. पूर्वी अज्ञानाच्या अंधेरांत दोरी साप म्हणून भासली त्यामुळें भीति वाटली ती साहजिक समजतां येअील. पण आतां ती साप नसून दोरीच आहे हें विज्ञानाच्या अुजेडांत स्पष्ट झालें असतांसुद्धां तो साप आहे म्हणून लोकांस थापा मारीत सुटणें, भिवविणें नी काठ्या घेऊन तीवर मारीत बसण्याचा वा तिला दूध पाजण्याचा देखावा करणें हा मात्र कांहीं अंशीं निव्वळ वेडगळपणा नी कांही अंशीं लुच्चेगिरीहि होणारी आहे.

(३) विज्ञानानें जीं सत्यें आज निर्विवादपणें प्रत्यक्ष प्रत्ययाच्या आधारें सिद्धिलीं आहेत त्यांच्या प्रचारास अडथळा करणारीं अज्ञानमय व्रतें जशीं साफ सोडून दिलीं पाहिजेत तशींच या व्रतवैकल्याचीं रूपें कोणचेंहि अैहिक फल न देतां निव्वळ पुराणांतील भाकडकथांच्याच आधारावर प्रचलविलीं जातात त्या व्रतवैकल्याचीं तीं रूपेंहि बदललीं पाहिजेत. **अशा प्रत्येक व्रतास जी कसोटी लावावयाची ती ही, कीं ह्या व्रतानें ह्या लोकीं स्वतःचा, स्वतःच्या राष्ट्राचा वा अेकंदर मनुष्यजातीचा कांहींतरी प्रत्यक्ष लाभ होतो आहे कीं नाहीं ?** तसा अैहिक प्रत्यक्ष लाभ होत असेल तरच त्या व्रतवैकल्यांत दवडला जाणारा काल नी धन कांहींतरी सत्कार्यीं लागलें असें समजावें. नाहींतर तीं व्रतवैकल्यें अशा रूपानें करूं नयेत. व्रतांचा पारलौकिक लाभ पदरीं पडायचा असेल तर तो पडूनसुद्धां त्यावांचून अैहिक असा कोणचा तरी प्रत्यक्ष लाभहि मनुष्यजातीच्या पदरांत पडला पाहिजे. ह्या कसोटीस अुतरतील तींच व्रतवैकल्यें तशा दुहेरी लाभास देणाऱ्या रूपांत नी पद्धतीनें आचरावीं म्हणजे जरी क्वचित् त्यांच्यापासून होणारा कल्पित वा

संभवनीय पारलौकिक लाभ लटका पडला, तरीहि त्यांत दवडलेल्या समयाचा नी द्रव्याचा अैहिक लाभ तरी निःशंकपणें पदरांत पडणारा असल्यानें तीं केव्हांहि अगदींच व्यर्थ जाण्याची आपत्ति येणार नाहीं. ह्या दुसऱ्या प्रकारच्या व्रतास ही कसोटी कशी लावावी हें विशदिण्यासाठीं आतां या लेखांकांत अुदाहरणासाठीं तशा कांहीं व्रतांची छाननी करावयाचें योजलें आहे.

**लक्षवातींचें वा लक्ष दूर्वांचें व्रत–** देवाची सेवा म्हणून केलीं जाणारीं हीं व्रतें मकरसंक्रमणासारख्या अेका घटनेला नाक आहे नी ती घटना गाढवावर बसलेली आहे अशा निर्भेळ असत्यास फैलावणाऱ्या थापेबाजीचीं नसून सोज्वळ असतात; यास्तव तीं तितकीं आक्षेपार्ह नसतात. पण त्यांत विवेक अितकाच करावयाचा कीं, देवास प्रसन्नविण्यासाठीं केलेल्या या खटपटींचा प्रत्यक्ष व्यवहारांतहि कांहीं अुपयोग आज होत आहे का ? पूर्वी मोठमोठ्या देवळांचे गाभारे अंधकारमय असत. घरांतहि समया, लामणदिवे, पंथ्या यांचाच प्रचार असे. त्या काळीं केलेल्या वाती अेक आवश्यकताच असे. देवळांत त्या अुपयोगी पडत; घरांतहि लागत. पण हजारों वर्षांपूर्वीचें हातवातींच्याच अुजेडांत चांचपडण्याचें युग आतां बदललें आहे. जुन्या प्रख्यात देवालयांच्या गाभाऱ्यांतहि आतां विजेच्या वा ग्यासच्या झगझगीत बत्त्यानीं वा बटनांनीं सजावट होत आहे. घरींदारीं तर खेड्यांतूनहि कंदीलचिमण्या नी नगरांतून विजेचे वा ग्यासचे दिवे खोल्याखोल्यांतून लखलखाटत आहेत. मग आतां ज्या खोलींत, सभामंडपांत वा गाभाऱ्यांत ग्यासच्या वा विजेच्या प्रकाशाचा झगझगाट झालेला आहे, तिथेंच अेक लामणदिवा वा पंथी केवळ पणजोबांच्या वेळेस ती लावीत म्हणून लावून ठेवणें हास्यास्पद नाहीं काय ? मोटारीला बैल लावणें किंवा मशीनगनचा गोळा धनुष्याच्या तांतीनें फेंकणें हें जितकें विसंगत वेडेपणाचें, तितकेंच विजेच्या झुंबरांनीं दिवसासारख्या लख्ख प्रकाशलेल्या गाभाऱ्यांत समअीचा वा लामणदिव्याचा मिणमिण नंदादीप अुगीच



या लख्ख विजेच्या युगांत लाख वातींच्या
व्रतास देवहि हंसत असेल !

धुरकटत ठेवणें हेंहि ! तेव्हां ज्या देवळीं : वा ज्या घरीं हातवातींच्या मिणिमिणी दिव्यांचा मुळींच अुपयोग नाहीं, त्या ठिकाणीं लाख वातींचें हें व्रत म्हणजे वेळेचा, कापसाचा नी तेलाचा निव्वळ अपव्यय आहे. पणजीचें युग पंथीचेंच असे. तेव्हां ती काडवाती करी तें शोभे. पण आतां या लख्ख विजेच्या युगांत लाखवातींच्या व्रतास देवहि हंसत असेल ! तेव्हां तें व्रत आतां त्या जुन्या मोडीच्या लामणदिव्यांच्या अडगळींतच टाकून देणें बरें.

पण तरीहि त्या व्रतांतील जो देवाच्या सेवेचा श्रद्धावंत मनाला अुदार करणारा हेतु, तो मात्र सुटतां कामा नये. त्याच हेतूनें पण ज्यायोगें प्रत्यक्ष व्यवहारांत आज मनुष्यजातीचें अल्पस्वल्प हितहि साधतां येईल अशा रूपानें तें व्रत आचरावें. अेक कोणचा तरी तसा प्रकार सुचवायचा तर असें सुचवितां येईल, कीं त्या वेळांत टकळीवर सूत काढावयास शिकून तें फक्कड सूत अमुक प्रमाणांत देवाच्या नांवें दान द्यावें अेकाद्या प्रामाणिक निर्धन विण-कऱ्यास ! किंवा मागावर तें स्वतः विणावें नी ती खादी हीनदीन पण स्वतः शक्य ती मेहनत करणाऱ्या सच्छील कुटुंबास द्यावी. अशा लोकहितानें, नरांच्या सेवेनें—जर लाखवाती नी तेल निष्कारण भुरुभुरु जाळण्यानें तो संतोषत असेल तर—नारायण अधिकच संतोषेल यांत शंका नाहीं !

## तीच गोष्ट लाख दूर्वांची !

तासोनतास परड्यांतून नी खिडारांतून त्या गवताची अेकेक काडी खुडीत वेळ गमवायचा आणि तो भारा गणपतीच्या डोक्यावर द्यायचा ! पऱ्या नी दूर्वा वाहातांना त्या भाऱ्याखालीं बहुधा त्या गणपतीगौरींच्या टीचभर मूर्ति कापसाच्या ढिगांत सरकी दबून गुदमरून जावी तशा नुसत्या गुदमरून जातात ! अेखाद्या अशा व्रतस्थ महिलेच्या भक्तानें जर स्वतःच्या महिलेला लाख कडव्यांच्या पेंड्या वाहाण्याचा प्रेमसंकल्प केला नी तिला मध्यें बसवून त्या पेंड्या



मोदक खाणाऱ्या गणपतीस गवताचे भारे वहावयाचे आणि गवत खाणाऱ्या "गो-मातेस" सुग्रास पंचपक्वान्नांचे गोग्रास वहायचे ! हीं काय व्रतें कीं विटंबना ?

तिच्या औतिभौतीं, वरखालीं, तिच्या कानांत, नाकांत, डोळ्यांत, तोंडांत त्या काड्या घुसतात कीं नाहीं तेंदेखील न पाहातां म्हण 'अर्पयामि' कीं रच पेंढी अशा वाहिल्या तर त्या भक्ताची तशी भक्ति जीव गुदमरून गेलेली ती स्त्री किती वेळ सोशील? मग सगुण भक्तीच्या दृष्टीनें बोलायचें तर त्या गौरीगणपतींच्या मूर्तींस आपल्या गवतपाल्यांच्या भाऱ्यांत गुदमरून टाकतांना त्याची काय-काय दुर्दशा होत असेल हें नको का बघायला? श्वास घेण्यापुरती त्या मूर्तीच्या नाकापुढची जागा तरी रिकामी ठेवावी! पुन्हा हा लाख दूर्वांच्या गवताचा भारा गणपतीस कां वाहायचा! गणपती गवत कां खातो? गवताच्या भाऱ्यास वाहावयाचेंच, तर तो गायीस तरी वाहावा; तो भारा खाऊन झाल्यास पशु प्रसन्न होईल. या जगांत पितां येईल असें दूध देईल. पण मोदक खाणाऱ्या गण-पतीस लाखों दूर्वांच्या गवताचे भारे वाहावयाचे आणि गवत खाणाऱ्या नी ओखटवाणीच हौशीनें खाणाऱ्या 'गोमातेस' माणसासारखें सुग्रास पंचपक्वान्नांचें पान वाढून तो गोग्रास वाहायचा! हीं काय व्रतें कीं विटंबना? भाकड पोथ्यांच्या नादानें असला पात्रापात्रतेचा लवलेश विचार न करणारा हा वेडगळपणा अक्षरशः आज खरो-खरीच आचरला जात आहे कीं नाहीं बरें? पोथीच हवी तर ती भगवद्गीता नाहीं का? श्रद्धादेखील तिला अुपनिषदांसमान पूज्य मानते; तींत 'देशे काले च पात्रे' जें जें दान तें तेंच सात्त्विक नी 'अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते। दीयते बहुलायासं तत् ताम-सुदाहृतम्' असें सांगितलें आहे. त्या प्रकारें व्रतात्मक दानांत नी दानात्मक व्रतांत आम्हीं आतां 'देशा'प्रमाणें नी 'काला'प्रमाणें पात्रा-पात्रविवेक केलाच पाहिजे.

तेव्हां हिरव्या गवतासंबंधीं वा वनस्पतिविषयकच व्रत करायचें तर शेतकरणीसारखा चक्क पातळाचा कांचा मारून विळा घेऊन हिरव्यागार रानांत जावें नी लाख दूर्वा खुडीत खिडारांत जो तास

घालवावयाचा त्यापेक्षां त्याच वेळांत कचाकच गवताच्या पंधरावीस हिरव्यागार पेंड्या कापून देवाप्रीत्यर्थ गाअीस घालाव्या किंवा सुवासिक सुंदर फुलांरानफुलांच्या परड्या भरभरून आणून त्यांचे गजरे मोलकरी मुलींना भेट द्यावे, किंवा आपल्या वा कोण्या आप्ताच्या अंगणांत स्वतः पाणी भरून फुलवाडी लावावी आणि मालती, सोनचाफा, जाअीजुअी, गुलाबाचीं सुंदर फुलें प्रत्यहीं देवास वाहावीं; सारींच्या सारीं अुगीच देवावर ढीग रचून नव्हे, तर देवघरांत शोभतील तितकीं तिथें नी बाकी हार करून फुलपात्रांतून घरांत दाराशीं नी घरांत कुशलपणें विरचावीं. आपल्या घरच्या नी ज्यांना तीं मिळत नाहींत अशा दीन कुमारिकांच्या केंसांतून आपण स्वतः पाणी भरून वाढविलेल्या लतावेलींचीं तीं ताजीं टवटवीत फुलें गुंफावीं, कीं ज्यायोगें जिथेंजिथें त्या वावरतील तिथेंतिथें त्या त्या दिवशीं नी रात्रीं सुरेखपणाचें नी सुवासाचें वातावरण दरवळत राहावें! अशा आरोग्यप्रद नी आनंददायी सौंदर्याची पूजा हेंहि अेक व्रतच आहे. वाल्मिकीसारख्या वानप्रस्थानेंदेखील सीतेसारख्या संयमशील ललनेससुद्धां असेंच अेक व्रत सांगून लडिवाळ आश्वासन दिलें नाहीं का, कीं 'पयोघटैराश्रमबालवृक्षान् । संवर्धयन्ति स्वबलानुरूपैः। असंशयम् प्राक्तनयोपपत्तेः । स्तनंधय प्रीतिमवाप्स्यसि त्वम् ।'

**वडपिंपळांना लाख प्रदक्षिणा**– अशा वर्गातल्या व्रतांसहि वरचीच कसोटी लावावी. वनस्पतींशीं जीवैक्याची भावना अनुभवायची वा संवर्धावयाची तर त्यांच्या भोंतींभोंतीं फिरण्याचा मार्ग टाकाअू आहे. हे विशाल विस्ताराचे वृक्ष आपल्या अुष्ण प्रदेशांतील लोकांस त्यांच्या छायाशीतलतेनें अत्यंत वत्सल वाटावे नी त्यांविषयीं कृतज्ञता व्यक्तविण्याची प्रवृत्ति व्हावी हें आपल्या लोकांच्या दयाशील संस्कृतीस साजेसेंच आहे. पण त्यासाठीं त्या झाडांना देवच करून टाकणें आपल्या संस्कृतीच्या पदरीं बुद्धिहीनतेचा दोष बांधण्यासारखें आहे! या विशाल नी अुपयुक्त वृक्षांची मनुष्याला अुपयुक्त होअील अशी लागवड वाढवणें, जोपासना करणें, अितर अुपयुक्त

वनस्पतींना त्यांच्या त्यांच्या प्रकृतीप्रमाणें खतपाणी देणें हीच तें मतैक्य प्रदर्शविण्याची अुचित रीत. हींच झाडें चांगलीं का ? तर मनुष्याला अुपयुक्त म्हणून. मग भरवस्तीची शोभा बिघडविणारा वडपिंपळ किंवा ज्यांच्या फांद्या नी विस्तार पडावयास झालीं आहेत असा भरवाटेवरचा वडपिंपळ तोडून टाकणें हेंच जेव्हां मनुष्याच्या हितास अवश्य, तेव्हां तेंहि केलें पाहिजे. वडपिंपळ तोडायचाच नाहीं, ह्या हट्टापायीं तो अेकदम वाऱ्यासरशीं कोसळून त्याखालीं माणसें मरतात अशा घटना या देशांत ज्या घडतात त्या आपली सुसंस्कृत दयाशीलता दाखवीत नसून रानटी क्रूरपणा मात्र दाखवितात.

वडपिंपळांसारख्या झाडांखालीं तापलेल्या वाटसरूंस जशी छाया मिळते तशाच त्यांच्या प्रचंड फांद्या कोसळून प्रसंगीं त्यांचा प्राणहि जातो. तीं निर्बुद्ध झाडें कांहीं जाणूनबुजून आपलें रक्षण करीत नाहींत; त्यांना प्रदक्षिणा घातली काय नी लाथा मारल्या काय. फांद्या पक्क्या आहेत तों छाया देणें, पोखरल्या कीं अुन्मळून पडत खालीं प्रदक्षिणा घालणारी बालबालिका जें सांपडेल त्याचा चुराडा करणें, ह्या त्यांच्या भावनाशून्य यांत्रिक क्रिया ! अेक वेळ गाढवाच्या अंगावर हात फिरविला वा त्याला चुचकारलें तर तें संतोषून अंगास खेटूं लागतें; काम अधिक हौसेनें करतें; त्याची खोडी केली तर लाथा झाडतें. पण त्या गाढवाअितकीदेखील मनुष्याच्या प्रेमलोभाची वा हिताहिताची सुसंवादी जाणीव ज्या वडपिंपळांस नाहीं त्यांना लाख प्रदक्षिणा घालण्यांत काय अर्थ आहे ? झाडांना जाणीव आहे— पण तशी सूक्ष्मार्थी दगडांनाहि आहे; निवडुंगालाहि आहे; पण म्हणून तो निवडुंग अुंसासारखा सोलून का खायचा ?

ह्या पात्रापात्रतेच्या विचाराप्रमाणें अुपयुक्ततेच्या दृष्टीनेंहि अशीं व्रतें अधिकच टाकाअू ठरतात. जुनीभाबडी दृष्टि त्या वड-पिंपळांना देवता समजन फेऱ्या घालते तेंहि अेकवेळ परवडेल; पण



तीं निर्बुद्ध झाडें कांहीं जाणूनबुजून आपलें रक्षण करीत नाहींत.... फांद्या पक्क्या आहेत तों छाया देणें, पोखरल्या कीं उन्मळून पडत खालीं प्रदक्षिणा घालणाऱ्या बालबालिकांचा, सांपडेल त्याचा चुराडा करणें, हृया त्यांच्या भावनाशून्य यांत्रिक क्रिया !

अशा जुन्या वेडेपणांस नव्या वैज्ञानिक वा व्यावहारिक दृष्टीनेंहि समर्थिणारें जें अेक पढतमूर्खांचें पथक असतें, त्यांचें तें समर्थन तर त्या भाबडेपणास अधिकच धिक्कारार्ह करून सोडतें. कसें तें पहा— वडपिंपळाला लक्ष प्रदक्षिणा स्त्रियांनीं घालाव्या या आमच्या दूरदर्शी दयाळु ऋषींनीं सांगितलेल्या व्रताचें हे पढतमूर्ख असें समर्थन करतात, कीं घरांत बसूनबसून बायकांस क्षयादिक विकार जडूं नयेत, म्हणून ह्या व्रताच्या मिषें हा व्यायाम घालून दिला आहे ही त्याची अुपयुक्तता! ह्याविषयीं अितकेंच म्हणावयाचें, कीं क्षयादि विकार जडेतों बायकांस घराच्या खुराड्यांत कोंडून ठेवणाऱ्या क्रूरतेस साजेल अशीच ही त्यांना अंगणांतल्या वडाभोंवतीं पाळीव कोंबड्यांसारख्या गरगर फिरूं देणारी दया आहे! बहुधा गांवांतल्या गाडीतळाच्या गदळ जागीं वा अंगणांत वा गल्लीकुचीच्या टोकाशीं असलेल्या कोंदट वातावरणांतच हे वडपिंपळहि असतात. त्यांच्याभोंतीं सारख्या गरगर शेंकडों फेऱ्या घालण्याच्या व्यायामानें क्षयरोग हटण्यापेक्षां होण्याचाच अधिक संभव; क्षयरोगी स्त्री लाख गिरक्या घेतांघेतां चक्कर येअून तिथल्या तिथें मुक्त झाली नाहीं म्हणजे भाग्य! क्षयरोगापासून बचावणारा व्यायामच स्त्रियांस द्यावयाचा होता तर त्या 'दूरदृष्टि सर्वज्ञ ऋषीची' दृष्टि गांवालगतचीं मोकळीं शेतें दिसण्याअितकीहि दूरदर्शी नव्हती कीं काय? प्रत्यहीं संध्याकाळीं स्त्रियांनीं त्या गांवाबाहेरच्या मोकळ्या वातावरणांत सलिलपणें हिंडून यावें असें व्रत असतें तर तें 'व्यायामा'र्थ म्हणतां येतें. खरी गोष्ट अशी आहे, कीं पूर्वीं साऱ्या जगभर झाडाझुडुपांना देवता मानून पूजण्याची जी चाल प्रचलित असे, त्याच चालीचें आपल्या हिंदुधर्मांत अुरलेलें हें अेक अज्ञान आहे. त्याचा व्यावहारिक लाभ दमडीचाहि नाहीं.

अेकदां असा अभिप्राय आम्हीं व्यक्तवीत असतां अेक जुन्याचे प्रामाणिक अभिमानी म्हणाले, 'त्यापासून कांहींतरी व्यावहारिक लोकोपयोगी लाभहि होअील असें वळण या वडपिंपळाच्या लक्ष

प्रदक्षिणांच्या व्रतास लावा– तें अगदींच धिक्कारतां काय !' तेव्हां आम्हीं म्हटलें, 'त्या व्रतापासून अैहिक लाभहि करून घेण्याची दुसरी तोड तर कांहीं सुचत नाहीं. हां, अेक तोड आहे. त्या वडा-पाशीं अेक चिमुकला तेलाचा घाणा बसवावा; त्याची सांखळी त्या व्रतस्थ महिलेच्या कंबरपट्ट्यास अडकवावी; घाण्यांत तीळ टाकून मग तिनें प्रदक्षिणा घालण्यास आरंभावें म्हणजे ज्या हजारबाराशें प्रदक्षिणा तिच्या प्रत्यहीं व्हावयाच्या त्या संपतांच शेर दीड शेर तेल तरी त्या घाण्यांत गळेल. तें देवाच्या नांवें कोणा मेहनती पण दरिद्री कुटुंबास दान द्यावें; म्हणजे अेका महिन्याचा फोडणीचा खर्च तरी निघेल ! तसें करवत नसेल तर हीं अशीं पारलौकिक दृष्ट्या अगदीं भाकड नी व्यावहारिक दृष्ट्या अगदीं कुचकामीं व्रतें करण्यांत समय नी श्रम दवडूं नयेत.'

महिलांनो, फेऱ्या घालण्याचेंच व्रत करावयाचें, तर स्वदेशी वस्तूंच्या प्रचारार्थ प्रत्यहीं पन्नास घरांतील कुटुंबांत जाअून प्रचार करण्याचें व्रत घ्या. तुम्ही पांचपांचजणी, देवाचें कार्य म्हणून मान-अपमान न पाहातां जर पन्नास घरीं प्रत्यहीं आळीपाळीनें भेट द्याल नी त्या कुटुंबांत स्वदेशी साखर, बांगड्या, स्टोव्ह, कांचकाम, धार-काम ( कट्लरी ), कापडप्रभृति वस्तु वापरण्यासाठीं स्त्रियांचीं मनें वळविण्यास झटाल; ज्यांनीं तसें निश्चयिलें त्यांचा तो निश्चय टिकून आहे कीं नाहीं याची सतत वर्षभर पाहाणी करीत राहाल; वेळीं स्वतः तें तें विकाअू स्वदेशी सामान नेअून दुकानांत असतें त्याहून स्वस्तें द्याल तर आम्ही अशा चळवळींच्या अनुभवाची हमी देतों, कीं तुमचें गांव स्वदेशीचें तसें कट्टर गिऱ्हाअीक होअील कीं जसें शंभर व्याख्यानांनीं वा वृत्तपत्रीय अग्रलेखांनीं होअूं शकत नाहीं ! व्याख्यानालेखांनीं महिन्या दीड महिन्यांची हुल्लड होते. पण स्वदे-शीची सांथ नी संतत ज्योत तेवत ठेवली जाते अशा संतत नी घरो-घरीं केलेल्या प्रचारामुळें, पाहाणीमुळें. बरें, ह्या स्वदेशीच्या जाणि-वेची ज्योत घरोघर अशी तेवत ठेवल्यानें जी मानसिक राष्ट्रीय

शिकवण लोकांस मिळेल; जी आर्थिक उन्नति होऊन स्वदेशी काम-कऱ्यांच्या तोंडांत दोन घांस पडतील; परदेशांत जाणारा अितका पैपैसा स्वदेशांत राहील त्या स्वदेशसेवेनें, त्या नरनारींच्या सेवेनें तो नारायण वडपिंपळाभोंवतीं लाख वेळीं बैलासारखें गरगर फिर-ल्यानें वा लाखवातींचा कापूस अुगीच जाळून टाकल्यानें वा लाख दूर्वांचा नी बेलांचा भारा वाहिल्यानें तो नारायण संतोषतो त्याहून लाख पटीनें अधिक संतोषणार नाहीं असें कधीं तरी घडेल काय ? आणि त्या वडपिंपळाच्या प्रदक्षिणांनीं मिळणारें जें काय तुमचें काम्य फल असेल, तेंहि तो देव या व्रतानेंहि दिल्यावांचून राहील काय ? मिशनरी बाया जशा ख्रिस्ती धर्माचा उपदेश करीत तुमच्या वस्तींत फिरतात, तशा तुह्मी शुद्धीचा अुपदेश करीत बाटच्या ख्रिश्चन वस्तींत हिंडा; तें व्रत धरा ! अमुकच प्रकारची लोकसेवा करा, हा आग्रह नाहीं. तुम्हांस व्यक्तिशः जी झेपेल ती लोकसेवा करा; पण या लोकीं लोकोपकारक कोणतें तरी प्रत्यक्ष फल देणारें पुण्यकृत्य ज्यांत साधतें अशीं आणि अशींच व्रतें धरा म्हणजे राष्ट्रसेवा घडेल नी पारलौकिकदृष्टचा ती लोकसेवा केव्हांहि पुण्यप्रदच असल्यानें व्रतानें जो कोणचा सकाम वा निष्काम पारलौकिक लाभ तुम्हांस हवा तोहि जर वडपिंपळाच्या सेवेनें मिळत असेल तर त्या लोकसेवेच्या प्रत्यक्ष परोपकारी व्रतानेंहि मिळेलच मिळेल. कारण कांहीं झालें तरी नारायणाची व्यक्ति वडपिंपळ, दगडधोंडा, शेणमाती, यांच्या जड मूर्तींहून नराच्या सचेतन मूर्तींतच अधिक अुत्कटत्वानें आलेली आहे. हें नाकारण्याची छाति भाकडांतील भाकड पोथीसहि होणारी नाहीं ! नराच्या सेवेसारखी कोणतीहि पूजा, कोणतेंहि व्रत नारायणास संतोष-वीत नाहीं. 'सारंसारं समुद्धृत्य' जें शास्त्रेंहि सांगतात तें हेंच, कीं 'परोपकारः पुण्याय पापाय परपीडनं !' विरक्त भक्तीच्या भर रंगांतहि तुकोबा जाणून आहेत, कीं 'जे कां रंजलेगांजले त्यांसी म्हणे जो आपुले । तोचि साधु ओळखावा देव तेथेंचि जाणावा ।'

# व्रताची पोथी म्हटली कीं ती प्रथम वाचावी अथश्रीपासून नव्हे तर अितिश्रीपासून !

ज्योतिर्गोलविषयक व्रतांना सृष्टिनियमाच्या अज्ञानामुळें तीं प्रचलित झालेलीं म्हणून अज्ञानजन्य म्हणतां येतील; वर दिग्दर्शिलेल्या लाख दूर्वा व्रतादिक वर्गास भाबडें म्हणतां येअील; पण त्यांपेक्षां निराळा जो शेंकडों व्रतांचा आणखी अेक वर्ग आहे त्यास तर भोंदु हेंच नांव लावणें भाग पडतें. त्यांचा मुख्य अुद्देश दक्षिणा नी दानें अुपटण्याचे शक्य तितके प्रसंग शोधून काढण्यावांचून दुसरा कांहींहि असेलसें त्या त्या पोथ्यांवरून दिसत नाहीं. त्या त्यांच्या भाकड अुपपत्त्या, तीं पोकळ फळें, तीं बाष्कळ विधिविधानें— आणि शेवटीं ती ठराविक दक्षिणा:पान्तु — तें सर्व वाचतांच धडधडीत थोतांड वाटल्यावांचून राहात नाहीं. अुदाहरणार्थ अेकदोन भाकडकथा पाहा.

**कोकिळाव्रत** — सुसंस्कृत अनुष्टुपांत लांबलचक रचलेल्या ह्या पोथीचा सारांश असा, कीं अेकदां दक्षयज्ञविध्वंसनार्थ शंकर-पार्वतींचें भांडण झालें. शंकराच्या शापानें पार्वती कोकिळा झाली; अु:शाप होअून पुन्हा पार्वतीची पार्वती होअून नांदूं लागली. यासाठीं सर्व स्त्रियांनीं युगानुयुगें कोकिळेचें व्रत करावें म्हणजे ठराविक दिवशीं कोकिळा पूजावी. पण ती कशी ? तर अुत्तम पक्ष म्हणजे यथाशक्ति अेक सोन्याची कोकिळा करावी; डोळे मोत्यांचे, पाय रुप्याचे आणि रुप्याच्या वृक्षावर तिला बसवावी. स्नान, अुपास करून तिची पूजाअर्चा झाल्यावर शेवटीं ती सोन्यामोत्याची कोकिळा त्या रुप्याच्या वृक्षामुद्धां दान द्यावी भटास ! आजहि स्त्रिया हें व्रत असें आचरतात.

आतां ही भक्ति कीं भामटेगिरी ? शंकर-पार्वती लाखों वर्षांपूर्वी म्हणे भांडले ! पण त्यानंतर तें भांडण मिटून ते पुन्हा चांगले नांदूं लागले, हंसले, नाचले, सोंगट्या खेळले, त्यांना मुलेंलेकरें झालीं

ह्या साऱ्या बातम्या भूलोकांवर कधींच येअून पोंचल्या आहेत आणि ज्याअर्थी ह्या बिनतारीच्या युगांतहि त्या शंकरपार्वतीचें वेडेवांकडें झाल्याची बातमी आलेली नाहीं, त्या अर्थी ते अजूनहि संसार थाटूनच आहेत हें उघड आहे. मग आतां कोणा अेक्या नवराबायकोच्या क्षणिक भांडणांत पार्वती कोकिळा झालीं म्हणून कर कोकिळा कीं पूज हा खाक्या युगानुयुगें हवा कशाला ? पार्वती कोकिळाच राहिली असती तर तीच कोकिळा तेवढी भेटतांच तिला कोणींहि नमस्कार केला असता; पण ती पुन्हा पार्वतीची पार्वती झाली म्हणतां. पार्वती अेक कोकिळा झाली म्हणून साऱ्या कोकिळा पार्वत्या होतात कीं काय ? देव अेकदां डुक्कर ( वराह ) झाले म्हणून आजहि धर डुक्कर कीं कर पूजा असें करायचें कीं काय ? बरें, अेवढ्यावरहि कोकिळाच पूजायची, तर अुत्तम मार्ग म्हणजे कोकिळेच्या अेका खऱ्या जिवंत पिलास धरून खऱ्या हिरव्यागार वृक्षावर स्थापून त्याची पूजा करावी; तें पाळावें हवें तर ! पण मग भटास काय लाभ राहिला त्या अुठाठेवींत ! म्हणून पार्वती जिवंत कोकिळा झाली असतां पुजायची कोकिळा हवी निर्जीव सोन्याचीच ! नी पार्वतीच्या कोकिळेचे डोळे चांगले सजीव पाणीदार असतां पूजायच्या कोकिळेचे डोळे हवेत पांढरे झालेले मोत्यांचे ! बरें, सोन्यामोत्या-रुप्यांची का कोकिळा होअीना; पूजल्यावर ती यजमानानेंच भक्ति-भावानें स्वतःच्या देव्हाऱ्यांत ठेवावी हें साहजिकच ! पण नाहीं ! ती लगेच देअून टाकली पाहिजे भटाला ! तरच तें व्रत सफळ; नाहीं-तर अित्थंभूत निष्फळ ! अर्थात् त्या व्रताचें सारें मर्म पोथीच्या पहिल्या पानांत त्या दक्षिणाः पांतूंतच सांपडणारें आहे !

**संकटी सोमवार**— सोमवारीं सबंध दिवस शक्य तर पाणीहि न पितां अुपास करावा. संध्याकाळीं रोटाचे तूपगूळ घालून तीन लाडू करावेत; अेक गाअीला, अेक देवाब्राह्मणास नी अेक आपण खावा. असे कडक अुपास सोळा सोमवारीं करावे ! नी शेवटीं शक्यतों सोळा जोडपीं भटांचीं बोलावून त्यांस रोटतूपगुळांचे



बिचाऱ्या स्त्रीनें सोळा सोमवार कडकडीत उपास करावे, त्याचें प्रत्यक्ष फळ मात्र मिळावें सोळा भटांच्या जोडप्यांस चमचमीत जेवण्याचें—आणि गाईस! माणसानें उपाशी रहावें नी गाईस-पशुस-लाडू चारावे !

लाडू यथेच्छ जेववावे; गायीस पान वाढून द्यावें नी मग ते अुपासव्रत सोडून मग आपण जेवावें! त्या बिचाऱ्या स्त्रीनें सोळा सोमवार कडकडीत अुपास करावे; त्याचें प्रत्यक्ष फळ मात्र मिळावें सोळा भटांच्या जोडप्यांस चमचमीत जेवण्याचें, आणि गायीस! माणसानें अुपाशी राहावें नी गायीस—पशूस लाडू चारावे! असल्या बाष्कळ-पणानें पोथी म्हणते तसा देव प्रसादत असो वा नसो; पण प्रत्यक्ष निःशंकपणें जर कोणी प्रसादत असेल तर तीं सोळा भटांचीं जोडपींच होत! दक्षिणाःपांतुवांचून ह्या व्रताचें भारूड रचण्याचा दुसरा काय उद्देश असणार!

यास्तव या व्रतांच्या पोथ्यांविषयीं अेक सर्वसाधारण नियमच असा सांगावासा वाटतो, कीं अशी व्रताची पोथी घेतली, कीं ती अथ-श्रीपासून प्रथम वाचूंच नये. कारण, देवांचीं मोठमोठीं नांवें, अद्भुत कहाण्या, स्वर्गाच्या पुष्पितवाक् गप्पा यांच्या ढिगांत पोथी रचणारांचा कावा अगदीं छपून बसलेला असतो. पण तो शेवटच्या पानांत मात्र न हुडकतांहि सहज सांपडतो. तेव्हां पोथी घेतांच तिचें शेवटून पारायण करूं लागावें; अितिश्री प्रथम वाचावी. जर का त्या शेवटच्या पानांत दक्षिणाःपांतूवरच मुख्य भर दिसला, तर शंभरीं नव्वद असें हें व्रत कोण्या भक्तानें नसून भोंदूनेंच रचलें असलें पाहिजे असें बेखटक समजावें नी तें टाकून द्यावें.

आणि स्वीकारावें कोणकोणचें व्रत? तर ज्या व्रतामुळें आज विज्ञानानें साफ खोट्या पाडलेल्या कोणत्याहि भौतिक वा भावनिक असत्याचा प्रसार करण्याचें पाप घडत नाहीं; ज्या व्रतांत देवाप्रीत्यर्थ करावयाच्या दानानें वा स्वतःस भोगाव्या लागणाऱ्या अुपास, प्रदक्षिणा देहदंडप्रभृति कष्टांच्या योगानें प्रत्यक्ष व्यवहारांत आपल्या हिंदु-धर्माच्या नी राष्ट्राच्या सद्यःस्थितींत कांहींतरी अैहिक हितहि साधतां येअील; मनुष्याची आज अिथें रोखठोक अशी कांहीं हितावह सेवा केल्याचा परोपकार घडेल तें तेंच व्रत आचरावें. म्हणजे त्यायोगें अैहिक फळ तरी प्रत्यक्षपणें अिथल्या अिथें हातीं पडेल.

# व्रतें करावीं तर अशीं!

अुदाहरणार्थ, महिलावर्गापुरतेंच बोलावयाचें तर येत्या चातुर्मास्यांत महिलांनो, तुम्ही यथाशक्ति, यथापरिस्थिति ह्या आपल्या अत्यंत अडचणींत सांपडलेल्या प्राणप्रिय हिंदु राष्ट्राच्या सेवेप्रीत्यर्थ खालीं दिग्दर्शिलेल्या किंवा त्या हेतूनें त्यांसारख्या व्रतांपैकीं अेकेकीं अेकक व्रत जर धराल तर केवढी राष्ट्रसेवा करूं शकाल, बरें? 'आपल्या परसांत स्वतः आपल्या मेहनतीनें कोथिंबीर, वांगीं, मिरच्याप्रभृति शाकभाज्या लावीन नी देवा, तुझ्या नांवें पुण्याच्या अनाथ विद्यार्थिगृहासारख्या अेका प्रामाणिक संस्थेस चार महिने प्रत्यहीं ताजी भाजी पुरवीन.' असें व्रत लाखवाती, फुलबेल वाहाण्याच्या व्रतांहून कितीतरी देवप्रिय नी राष्ट्रहितकर होअील, बरें? किंवा असें व्रत घ्या, कीं 'या चातुर्मास्यांत आपल्या हातानें विणलेले वा शिवलेले पंचवीस सदऱ्यापोलक्यांचे जोड जीं हीनदीन पूर्वास्पृश्यांचीं मुलेंमुली शाळेंत जातात त्यांतील योग्य मुलांत वांटीन.' चतुर्थीचे अेकवीस मोदक वा सोमवारचीं सोळा जोडपीं सावकारी वा विम्याची अडत वा व्यापार करणाऱ्या पोटभरू ठराविक भटांसाठीं राखून ठेवण्यापेक्षां तितकें सामान वा पैसे दक्षिणा म्हणून आज हिंदुसंघटणाचें कार्य खऱ्या रामदासी बाण्यानें करणाऱ्या मसूरकर महाराजांच्या आश्रमास दान करीन.' येत्या चातुर्मास्यांत एक स्वदेशी साखरेचाच प्रश्न हातीं घेतला तरी जर प्रत्येक जिल्ह्याच्या नगरांत दहावीस स्त्रियांनीं प्रत्यहीं 'मी दहा कुटुंबांस भेट देऊन स्वदेशी साखरेचा प्रचार करीन' असें व्रत घेतलें नी चालविलें तर त्या चार महिन्यांत त्या गांवीं चार हजार रुपये तरी परदेशी साखरेंत जायचे वांचतील! करून पाहा होतें कीं नाहीं असें तें. आमची हमी अनुभवाची आहे. किंवा अुभ्या वर्षांत शंभर 'रुपयांची स्वदेशी बांगडी घरोघर फिरून खपवीन' किंवा 'तुळशीच्या लग्नासाठीं ताशेबाजंत्रीं लावण्याचा मूर्खपणा सोडून तशा व्रतांचा खर्च राखून अनाथ पण

सत्पात्र अशा दोन शुद्धीकृत हिंदूंच्या योगक्षेमाचा व्यय मी सोशीन वा त्या कार्यार्थं प्रत्यक्ष कार्यकर्त्या अशा हिंदुसभेस व आर्यसमाजास दान देअीन !' रत्नागिरी हिंदुसभेसारख्या ज्या संस्था शुद्धीकार्य सारखें करताहेत त्यांना मुल्लामिशनच्या हातून सोडविलेल्या अर्भक वा अनाथ मुलांमुलींचें संगोपन करतांना नाकीं नव येतात. जर शंभर रुपये मिळतांच शंभर विधर्मीयांस हिंदु करून दाखविणारी अमरावतीची हिंदुसभा द्रव्यसहाय्यास्तव अडकून पडत आहे तशा प्रत्यक्ष कार्यीं तसा अेक रुपाया दान दिलात तर अेक वंश हिंदु-राष्ट्राच्या गोटांत आणल्याचें श्रेय संपादाल ! हिंदुधर्माचा क्षय थांब-विणारा निदान रक्ताचा अेक बिंदु त्याच्यांत भर टाकून वा गळतांना वांचवून जें पुण्य लाभेल तें पांचशें अर्घ्य सूर्याला देअून लाभणार नाहीं ! पाणी ओतायचें तर तें व्रताचें पाणी तान्हेल्याच्या तोंडांत ओता—ताम्हनांत वा नदींत नव्हे ! तो मुंबईचा श्रद्धानंद अनाथ-महिलाश्रम पाहा ! मिशनमुल्लांच्या तावडीतून हजारों हिंदु स्त्रिया वांचविल्या; पण त्याला अजून अर्भकालय काढावयास दमडीहि गांठीं नसल्यामुळें त्या स्त्रियांच्या अर्भकांचें काय करावें हें सुचत नाहीं. सोन्याच्या कोकिळा—सावकारीचा धंदा करणाऱ्या भटांना देण्यापेक्षां कोण्या श्रीमान् महिलेनें जर त्या श्रद्धानंद महिला आश्रमास स्त्रियां-साठीं बारा लुगडीं चातुर्मास्यानिमित्त दान दिलीं वा स्वतःच्या कुटुंबां-तील मृत व्यक्तीच्या स्मरणार्थ अेक हजार वा अेक लाख जें यथा-शक्ति तें दान, अर्भकालय बांधून देण्यासाठीं दिलें तर तें अंत्येष्टी-प्रीत्यर्थ गाय, भांडीं, वस्त्रें, दानें, गांवच्या धंदेवाअीक भटांस देण्या-पेक्षां त्या दीनदयाळु देवास शतपटीनें अधिक प्रिय होणार नाहीं काय ? किंवा विमानविद्या शिकणाऱ्या अेका सुयोग्य पण निर्धन विद्यार्थ्याचा खर्च सोसण्याचें व्रत घ्या !

महिलांनो, जर हें हिंदुराष्ट्र जगेल; तगेल; जिंकील तर हिंदुधर्महि जगेल; जिंकील ! जर हें हिंदुराष्ट्रच मेलें; हिंदुस्थानचें

अहिंदुस्थान झालें तर ही हिंदु संस्कृति, हा हिंदुधर्मंहि मेलाच पाहिजे ! अशा स्थितींत तुम्हां हिंदु महिलांस खरें धार्मिक व्रत आचरावयाचें असेल तर आजच्या परिस्थितींत ह्या हिंदु राष्ट्राची प्रत्यक्ष फल देणारी अशी कांहींतरीं सेवा प्रत्यहीं करा ! तुमच्या द्रव्याचें दान, तुमच्या श्रमाचें दान, तुमच्या अन्नाचें दान, प्रसंगीं तुमच्या मानाचें नी अवश्य तर तुमच्या प्राणाचेंहि दान ह्या प्राण-प्रिय हिंदु राष्ट्रालाच द्या ! तोच आजचा ऐहिक धर्म; तोच आजचा पारलौकिक धर्म ! व्रतविधींत जो विधिक आज करावयाचा तोहि हाच !

✠ ✠ ✠

# मनुस्मृतींतील महिला

## [१]

वेदांच्या खालोखाल आपल्या हिंदु राष्ट्राचा अत्यंत पूज्य आणि आपल्या संस्कृतीचा, आचारांचा आणि व्यवहाराचा प्राचीन काळापासून आधारस्तंभ होऊन बसलेला असा जर कोणचा ग्रंथ असेल तर तो मनुस्मृति हाच होय. आपल्या राष्ट्राच्या अैहिक आणि पारलौकिक जीवनयात्रेचें नियमन शतकानुशतकें हा ग्रंथच मुख्यतः करीत आलेला आहे. आजहि कोटयावधि हिंदु ज्या निबंधान्वयें ( कायद्यानें ) आपलें जीवन आणि व्यवहार चालवीत आणि चालवीत आहेत ते निबंध ( कायदे ) तत्त्वतः तरी मनुस्मृतीवरच आधारलेले आहेत. मनुस्मृति हीच आजहि तत्त्वतः हिंदु निबंध ( हिंदु लॉ ) आहे. मूळ तें; अितर स्मृति, सदाचार वा रूढी त्याचाच विस्तार आहे वा असला पाहिजे असा आपल्या हिंदु निबंधशास्त्राचा सुप्रतिष्ठित संकेत आहे. ‘ वेदार्थोपनिबद्धत्वात्प्राधान्यंहि

मनोः स्मृतेः। मन्वर्थविपरीतातु या स्मृतिः सा न शस्यते ॥' असें स्मृतिकार बृहस्पतीहि म्हणतात.

हा ग्रंथ जसा पूज्य तसाच प्राचीनहि आहे. त्याच्या निश्चित कालासंबंधीं निर्णय लागलेला नाहीं हाहि एका अर्थी त्याच्या प्राचीनत्वाचाच पुरावा आहे! आमच्या या निबंधापुरतें अितकें सांगणें पुरें आहे, कीं आज जें पुस्तक मनुस्मृति म्हणून आपल्यापुढें आहे त्यांतहि कांहीं भाग फारच प्राचीन– अिसवी सनापूर्वीच्या आठव्या शतकांत म्हणजे उण्यापुऱ्या अडीच हजार वर्षांपुर्वींचा आहे; आणि हें बहुतेक पुस्तक जवळजवळ दोन हजार वर्षांपूर्वींचें आहे. रामायण-महाभारताचा अुल्लेखहि त्यांत शोधतां सांपडणें कठीण पडतें!

## आपल्या पंजीच्या पंजीची दोनशावी पंजी!!

अशा या आपल्या हिंदु राष्ट्राच्या पूज्य आणि प्राचीन स्मृतींत, कायद्याच्या पुस्तकांत, निबंधग्रंथांत, त्या प्राचीन काळीं आपला स्त्रीसमाज जीवन कसें घालवी, काय शिके, काय जेवी, कसा वागविला जाअी, कसा वगे, त्याचे अधिकार काय असत, कर्तव्यें काय असत, समाज स्त्रीविषयीं काय म्हणे, कन्येची स्थिति काय असे, मातेची काय, पत्नीची काय याविषयीं मिळणारी माहिती ही आजच्या अेकंदर स्त्रीवर्गासहि आकर्षक आणि उद्‌बोधक वाटल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या पंजीच्या पंजीची दोनशावी पंजी! — तिचें नांव काय असे, तिची मुंज केव्हां होअी, तिचें लग्न कसें होअी, श्राद्धाच्या दिवशीं ती सैंपाक काय करी, तिचीं मुलें तिला नमस्कार कसा करीत, ती आशीर्वाद कसा देअी, तिला नवरा कसा वागवी, तिच्या शेजारपाजारच्या आयाबायांचीं बोलणीं काय चालत, त्यांची चालचालणूक कशी असे, पुत्र व्हावा म्हणून त्यांना किती तळमळ वाटे, वंशाची वेली खुरटूं नये म्हणून पुत्रप्राप्तीस्तव त्या काय काय अुपाय करीत, पतिनिधनानंतर वैधव्यांत दिवस कसे काढीत, कां पुन्हा विवाह करीत, त्यांना कोणी टोंचून बोले कीं काय,

त्यांची दागिन्याबिगिन्यांची पेटी किती मोठी असे !— आपल्या पंजीच्या पंजीच्या दोनशाव्या पजीच्या प्रेमळ घरीं जाऊन तिला अशी ममतेची मनोमय भेट देणें आणि डोळे भरून नसली तरी मन भरून पाहून येणें कोणासहि कौतुकावह, समाधानाचेंच वाटणारें आहे. समाजशास्त्राच्या अभ्यासकांना तर दोनअडीच हजार वर्षांपूर्वीच्या हिंदु स्त्रीवर्गाच्या जीवनाचें यथावत् प्रत्यक्ष दर्शन घडविणारा— मनुस्मृति हा अेक चित्रपटच आहे. चित्रपटांची कला नव्हती तेव्हांहि जेव्हांच्या तेव्हां यथावत् अंकण करून राखलेला खराखरा अैतिहासिक चित्रपट आहे !

महाराष्ट्र वाचकांसाठीं आम्हीं, यास्तवच, त्या पूज्य नी प्राचीन चित्रपटांतील 'मनुस्मृतींतील महिला' नांवाची ही अेक 'चित्रावलि' (फिल्म) स्त्री मासिकाच्या पडद्यावर दाखवीत आहों.

आपल्या अर्वाचीन स्त्रीविषयक भावभावनांच्या रंगांचें शितोडे कळत नकळत त्यांवर अुडून त्यांचें निर्भेळ अैतिहासिक स्वरूप लोपण्याची भीति मुळींच अुरूं नये म्हणून आम्हीं हीं शब्दचित्रें आमच्या शब्दांत न देतां थेट मनुस्मृतीच्याच शब्दांत देणार आहोंत. मनुस्मृतींतील श्लोकच शक्य तों प्रथम देअून मग आम्हांला कांहीं विशेष सांगावयाचें तर तें स्वतंत्रपणें त्या त्या स्थळीं वेगळें करून उल्लेखूं. मूळ श्लोक पुढें असले म्हणजे आमच्याहून वेगळा अर्थ वा अनुमान कोणास सुचलें वा रुचलें तर त्यासहि या व्यवस्थेनें तेंच अंगिकारणें अधिक सोयीचें होअील.

## अपौरुषेय, त्रिकालाबाधित, अनुल्लंघ्य "धर्मशास्त्र" म्हणून नव्हे, तर बुद्धिमीमांस्य अशी केवळ अैतिहासिक माहिती म्हणून !

या लेखमालेच्या आरंभीं आणखी कांहीं विधेयांस अुल्लेखिणें अवश्य आहे. मनुस्मृति हें आपल्या हिंदु समाजाचें आजहि तत्त्वतः

तरी पुष्कळ अंशीं प्रमाणभूत मानलें जाणारें 'धर्मशास्त्र' आहे. ॥ धर्मशास्त्रं तुवै स्मृतिः ॥ यांत, आजच्या परिभाषेंत फोड करून सांगायचें म्हणजे, निर्बंध (कायदा) आणि आचार ह्या दोन्हींचा समावेश असतो. पुरातन परंपरेप्रमाणें हीं दोन्हीं सारखींच अनुल्लंघ्य मानलेलीं असतात; आणि मनुस्मृतींत सांगितलेलें हें धर्मशास्त्र त्रिकालाबाधित नी अपरिवर्तनीय आहे असें समजलें जातें. त्यांतहि मनुस्मृतीचीच प्रतिज्ञा अशी आहे कीं, वेदाबाहेर ती कांहींहि सांगत नाहीं. ती स्पष्टपणें म्हणते,

यः कश्चित्कस्यचिद्धर्मो मनुना परिकीर्तितः ॥
स सर्वोभिहितो वेदो सर्वज्ञानमयोहि सः ॥ (अ. २, ७)
या वेदबाह्याः स्मृतयोयाश्चकाश्च कुदृष्टयः ।
सर्वास्ता निष्फलाः प्रेत्य तमोनिष्ठाहि ताः स्मृताः ॥
(अ. १२, ९५.)

वेद अपौरुषेय आहेत नी जे वेदांत सांगितलें तेंच मनुस्मृतींत; अर्थात् तें धर्मशास्त्रहि अपौरुषेय आज्ञांसारखेंच त्रिकालाबाधित नी अनुल्लंघ्य आहे अशी पुरातन विचारसरणी, ही 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' प्रवृत्ति, थेट मनुस्मृतीच्या कालापासूनच चालत आलेली आहे. मनुस्मृतीचें म्हणणें हें, कीं तींत जें धर्मशास्त्र सांगितलें तें अनुल्लंघ्य कां, ग्राह्य कां, तर तें श्रुतीला धरून आहे म्हणून!— अुपयुक्त आहे कीं नाहीं, कोणच्या परिस्थितींत तें अुपयुक्त, अैखाद्या परिस्थितींत तें राष्ट्रधारणास अनुपयुक्तच, नव्हे तर चक्क हानिकारक ठरलें तर बदलावें वा गाळावें कीं नाहीं, हे सारे प्रश्न दुय्यम, नव्हे अुपमादर्शक! तशी चर्चा, मीमांसा, होहि संशयार्थ तरी सर्वस्वीं निषिद्ध! श्रुतींत आहे म्हणूनच तें अनुल्लंघ्य, त्रिकालाबाधित. तेंच स्मृतींत म्हणून तीहि अनुल्लंघ्य, अमीमांस्य. हा स्वतः मनुस्मृतीचाच स्पष्ट डंका आहे. आम्हीं वर दिलेल्या वचनांसह हीं खालील वचनें वाचावीं—

